# नवभारत

वर्ष ९ वें ] एप्रिल १९५६ [ अंक ७ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका








## 'नवभारत' निधि

# -- विनंति --

'नवभारत' मासिक पुढें चालू रहावें, त्याची कार्यक्षमता वाढावी, या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

'नवभारत'निधि पुढें येतें वर्ष चालू रहाणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन 'नवभारत'-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. 'नवभारत'-निधीस १०० रु. ची देणगी देणारास 'नवभारत' मासिक दहा वर्षें मिळत राहील.

'नवभारत' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच 'नवभारता'च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

'नवभारता'च्या गेल्या म्हणजे मार्च १९५६ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. [illegible] अंकांत जाहीर केल्याप्रमाणें 'नवभारत'निधि-खा[illegible] एकूण जमा रक्कम रु. ४९२३-५-३ आ[illegible] आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम[illegible] आभारी आहोंत.

'नवभारत'निधि जमविण्याकरितां पुढील समि[illegible] नेमलेली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष[illegible] न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनं[illegible] नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुर[illegible] जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारी[illegible] प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडे[illegible] (खजिनदार), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. [illegible] मंगुडकर (संयुक्त कार्यवाह).

'नवभारत' निधिसमितीचें कार्यालय "[illegible] 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४" आहे. देणग्या, "खजिनदार 'नवभारत' समिति, ९०६ शिवाजीनगर पुणें ४" या प[illegible] पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अ[illegible]

२५।३।१९५६ **कृ. ना. फडके** } कार्य[illegible]
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** }

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें

अंक सातवा

# नवभारत

एप्रिल १९५६

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

न.






# 'नवभारत' मासिक, एप्रिल १९५६

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे-- का. सं. ]

**प्रा. राम जोशी** – मुंबई येथील 'रामनारायण रुईया' कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. मुंबई महानगरपालिकेचे सदस्य.

**प्रा. र. चिं. वडवे** – नडियाद येथील 'जे. जे.' कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. 'जीवनशिक्षण' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. चा. अ. दाभोलकर** – बी. एस्सी. (अॅग्रि), एस्. डी. डी. एच्. (ऑ.) – डेन्मार्क व ग्रेट ब्रिटन या देशांत जाऊन त्यांनीं शेती व डेअरीफार्मिंग या विषयांत उच्च शिक्षण व पदवी संपादन केली आहे.

**प्रा. दा. गो. ढवळे** – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. द. श्री. जोग** – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. अशोक रा. केळकर** एम्. ए. – पुणें येथील 'डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट' मध्यें भाषाशास्त्रीय विभागांतील कार्यकर्ते.

**श्री. मो. स. गोसावी** बी. ए., बी. कॉम. साहित्यविशारद. – पुणें विद्यापीठाचे दक्षिणा फेलो. हल्लीं एम्. कॉम्चा अभ्यास करीत आहे.

**श्री. अच्युत पटवर्धन** (बनारस) – महाराष्ट्रांतील एक प्रसिद्ध तत्त्वचिंतक व कार्यकर्ते. 'The Communal Triangle' या पुस्तकाचे एक लेखक.

**डॉ. वा. गो. परांजपे** (पुणें) – फर्ग्युसन कॉलेजमधील संस्कृतचे प्राध्यापक. हल्लीं सेवानिवृत्त.

**श्री. व. दि. कुलकर्णी** एम्. ए. – उस्मानिआ विद्यापीठांत पीएच्. डी. करितां अभ्यास करीत आहेत.

**सौ. कुसुम नारगोलकर** बी. एस्सी. – कैनाड (ठाणें) येथील आदिवासी सेवाकेंद्रांतील कार्यकर्त्या. 'जंगलचे राजे' या पुस्तकाच्या एक लेखिका.

**आचार्यभक्त श्री. द. वा. जोग** – उपनिषत्तीर्थ – पुणें येथील म. ए. सो. च्या हायस्कूलमध्यें शिक्षक. 'शांकर-अद्वैतमतानुवाद' या पुस्तकाचे लेखक.

---

प्रा. राम जोशी

# प्रजा-समाजवादी पक्षाचा नवा प्रबंध

गेले कित्येक महिने प्रजासमाजवादी पक्षांत चालूं असलेल्या वैचारिक मतभेदांना आळा घालावा व पक्षाचें तत्त्वज्ञान व चालूं धोरण निःसंदिग्ध शब्दांत जाहीर करावें या हेतूनें पक्षाचे अध्यक्ष **आचार्य नरेंद्रदेव** यांनीं एक प्रबंध लिहून तो पक्षाच्या गया-अधिवेशनापुढें ठेवला. हा प्रबंध आजवर पक्षानें वेळोवेळीं पास केलेल्या प्रबंधांहून अधिक व्यापक, स्पष्ट आणि मूलगामी आहे. तसेंच विचारांच्या दृष्टीनेंहि त्याची तात्त्विक बैठक वेगळी आहे. आचार्य नरेंद्रदेव हे मार्क्सवादावर श्रद्धा असलेले व मार्क्सवादी विचारसरणीनें सामाजिक घटनांचा अर्थ लावूं पाहाणारे एकमेव नेते पक्षांत आहेत असें म्हटलें तरी चालेल. श्री. अशोक मेहता, डॉ. लोहिया व शेवटीं खुद्द जयप्रकाशजी मार्क्सवादाच्या चौकटीबाहेर आले व त्यांनीं पक्षाच्या ध्येयधोरणाला नवें वळण लावण्याचें कार्य गेलीं ६।७ वर्षें केलें. समाजांतील संघर्षांचें, आर्थिक संकटांचें, राजकीय बदलांचें व आंतरराष्ट्रीय प्रश्नांचें विवरण व विश्लेषण अमार्क्सवादी पद्धतीनें होऊं लागलें. मार्क्सच्या अर्थशास्त्रीय, राजकीय, समाजक्रांतिविषयक सिद्धांतांवर आक्षेप घेणारें मूलग्राही विवेचन पक्षनेते करूं लागले व मार्क्सवादापलीकडे गेल्याशिवाय विसाव्या शतकांतील घडामोडींचें आकलन होणार नाहीं आणि लोकशाही-समाजवादाचें ध्येय गांठतां येणार नाहीं असें ते प्रतिपादूं लागले. पंचमढीचा धोरणविषयक प्रबंध या दृष्टीनें तात्त्विक मोलाचा होता; त्यांत मार्क्सवादी सिद्धांतांची अपूर्णता व अशास्त्रीयता दाखविण्याचा मार्मिक प्रयत्न होता.

गया-अधिवेशनांत पास झालेला प्रबंध यादृष्टीनें विचार करतां पक्षाला पुन्हां मार्क्सवादी चौकटींत बांधून टाकणारा आहे. आर्थिक संकटपरंपरांचें, राज्यसंस्थेविषयींचें व 'प्रगती'चें विवेचन संपूर्णतया मार्क्सवादी आहे. मार्क्सच्या विचारसरणींतील दोष अप्रत्यक्षपणें मान्य करून त्यांत हिंदुस्थानांतील विशिष्ट परिस्थितीनुसार बदल करण्यांत आले आहेत. परंतु विवेचनाचा सारा गाभा मार्क्सवादी आहे. एकंदर विवेचनावर गांधीवादी विचारसरणीचीहि छाया आहे. भूदान, विकेंद्रीकरण, सहकारी जीवन वगैरेंविषयींचें विवेचन नितांत सहानुभूतीनें झालेलें आहे. अशा रीतीनें मार्क्सवादी शालीला गांधीवादी झालर असा कांहींसा प्रकार त्यांत झाला आहे. त्यामुळें एकंदर विवेचन सैल व क्वचित् प्रसंगीं विसंगतहि झालें आहे. हें जरी असलें तरी देशांतील विविध प्रश्नांकडे व सामाजिक समस्यांकडे पाहण्याचा बराच तर्कशुद्ध दृष्टिकोण या प्रबंधानें दिला आहे. 'Only totalitarian parties have all-embracing philosophies. Democratic parties are essentially pragmatic in approach.' 'सर्वंकष अशा हुकुमशाहीवादी पक्षांनाच सर्व प्रश्नांसंबंधीं असें सामान्यस्वरूपाचें तत्त्वज्ञान असूं शकतें; लोकशाही पक्षांचा दृष्टिकोण व्यवहारवादी असतो' असें समजण्यांत येतें तें एका परीनें खरें आहे. परंतु तरी देखील संस्कृति, नीति, वाङ्मय आणि कला यांविषयीं लोकशाही समाजवाद्यांचा स्वतःचा दृष्टिकोण आहे. प्रजासमाजवादीपक्षाच्या नव्या प्रबंधांत या प्रश्नांचा प्रथमच विचार होत आहे. हा नवा प्रबंध बराच विस्तृत आहे व त्याची विचारसरणी प्रामुख्यानें पुढें दिल्याप्रमाणें आहे.

## समाजाला आलेलें संगराचें स्वरूप

हिंदुस्थान सांप्रत संक्रमणावस्थेंतून जात आहे. राजकीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीमुळें राजकीय जीवनांत बदल झाला असला तरी जीवनाच्या इतर क्षेत्रांत बदल झालेला नाहीं व तो करण्याची फारशी निकड अजून दाखविली जात नाहीं. विसंवादी अर्थव्यवस्था व समाजव्यवस्था यांमुळें लोकशाहीला धोका उत्पन्न झाला आहे. समाजांतील पिळणारे व पिळले जाणारे वर्ग तसेच कायम असून स्वातंत्र्याच्या काळांत







त्यांच्यांतील अंतर कमी होण्याऐवजीं वाढलेंच आहे. त्यामुळें प्राथमिक गरजा भागल्यानें होणाऱ्या समाधानालाहि बहुसंख्य समाज पारखा झाला आहे. लोकसत्तेवर धनसत्तेचें वर्चस्व असल्यानें तिच्या अस्तित्वाकरितां आवश्यक असलेली समाजघडी बदलल्या काळाशीं अनुरूप नसतांहि ती चालू ठेवण्याचे प्रयत्न होत आहेत. त्यामुळें आमचें सामाजिक जीवन विस्कळित झालें आहे; जुन्या बुरसटलेल्या न्याय-नीतिविषयक कल्पनांना स्थैर्याचे नांवाखालीं चिकटून राहण्याचा यत्न होत आहे तर दुसरीकडे समता व खरें स्वातंत्र्य यांना वाहिलेल्या शक्ती त्यांवर कडाडून हल्ले करीत आहेत त्यामुळें समाजाला संगराचें स्वरूप आलें आहे.

हा विसंवाद व संघर्ष टाळण्यासाठीं सामाजिक, आर्थिक व नैतिक जीवनांतच बदल होणें आवश्यक आहे. जातिवर्गनिरपेक्ष व शोषणरहित असा समाज निर्माण करणें आवश्यक आहे. पण निव्वळ राजकीय स्वातंत्र्यांतून ज्याप्रमाणें खरी लोकशाही निर्माण झाली नाहीं, त्याचप्रमाणें केवळ आर्थिक उत्थापनांतून खरें सुख मिळणें अशक्य आहे. समाजवादी क्रांति केवळ आर्थिक न राहतां तिला सांस्कृतिक व नैतिक क्रांतीचीहि जोड देणें आवश्यक आहे. नवसमाजरचनेच्या या प्रयत्नांत आपल्या संस्कृतींतील व परंपरेंतील सर्वच कल्पना त्याज्य मानल्या पाहिजेत असें नाहीं. उलट, मानवतावादी अशा अनेक विचारांचें व कल्पनांचें समाजक्रांतीला साहाय्यच होणार आहे. मात्र श्रद्धावादी मानवतेऐवजीं बुद्धिवादी मानवतावाद हाच स्वीकारला पाहिजे. संकुचित राष्ट्रवाद व उज्ज्वल भूतकालाची महति गाण्याची वृत्ति यांचा धोका टाळला पाहिजे. कारण त्यावांचून पाश्चिमात्य राष्ट्रांनीं वाढविलेल्या ज्ञानविज्ञानाचा लाभ आपणांस उठवितां येणार नाहीं. गतपरंपरेचा खूपसा भाग आतां कुचकामी झाला आहे; घटनाचक्राच्या गतीनें खिळखिळा झाला आहे. त्याची समाजवादाला गरज नाहीं. ह्या विकासशील जगांत राहावयाचें असेल त्यांना इतिहासाच्या मुशींत घडणाऱ्या नवनव्या हत्यारांच्या साधनानेंच भविष्यकाल घडवावा लागतो.

## अंतर्विरोध टाळण्याचे तात्पुरते प्रयत्न

भांडवलशाही अर्थव्यवस्थेनें समाजाची निरनिराळ्या वर्गांत विभागणी केली आणि फार मोठ्या सामाजिक विषमतेला जन्म दिला. सांपत्तिक विपुलतेमुळें शक्य होणारी चैन एकीकडे व दारिद्र्यामुळें होणारी उपासमार दुसरीकडे अशी दुभंग समाजरचना भांडवलशाहीनें निर्माण केली. वर्गकलह जन्माला घालून ज्या एका सामूहिक नीतिमत्तेच्या आधारावरच सुखी समाजजीवन कंठणें शक्य होतें त्या नीतिमत्तेलाच भांडवलशाहीनें सुरुंग लावला आहे. मानवी मूल्यांची जागा पैशानें घेतली आहे. ही भांडवलशाही आपल्या अंतर्गत विरोधामुळें आर्थिक संकटपरंपरांमध्यें सांपडते. त्यामध्यें लक्षावधि कष्टकरी जनतेचीं जीवनें उद्ध्वस्त होऊन सर्वांच प्रगतीस खीळ बसते. वाढत्या उत्पादनाबरोबर बेकारी व दारिद्र्यहि वाढत जातात व शेवटीं उत्पादक शक्तींचा गैरवापर होऊन मानवी श्रम आणि साधनसामग्री फार मोठ्या प्रमाणावर नाश पावतात. ह्या अनियंत्रित भांडवलवादावर व बेकारी आणि तज्जन्य संकटांवर तोडगा म्हणून केन्सचें अर्थशास्त्र पुढें आलें. परंतु तें अप्रगत राष्ट्रांना उपयोगी पडणारें नाहीं. ग्राहकांची क्रयशक्ति कमी झाल्यामुळें उत्पन्न मालाचा उठाव होत नाहीं व म्हणून क्रयशक्ति कृत्रिम नऱ्हेनें वाढविण्याचे त्यांतील मार्ग वरवरचे व भांडवलशाहीप्रधान अर्थव्यवस्थेंतील तात्पुरते अंतर्विरोध टाळण्यास कदाचित् उपयोगी पडणारे असले, तरी मागासलेल्या राष्ट्रांना अप्रस्तुत असे आहेत. राष्ट्रीय उत्पन्नाच्या विषम वांटणीचा त्यांत विचारच नाहीं. भांडवलशाहींत आर्थिक सत्ता व नियंत्रण मूठभर लोकांच्या हातांत केंद्रित झाल्यानें निर्माण झालेले धोके इतके स्पष्ट होते कीं खुल्या स्पर्धेवर विश्वास असणाऱ्या उदारमतवाद्यांना देखील शासनसंस्थेमार्फत नियोजन व नियंत्रण सुचवावें लागलें. राजकीय लोकशाहीनें दिलेल्या हक्कांची जाणीव सामान्य जनतेंत व विशेषतः कामगारवर्गांत जसजशी होऊं लागली, तसतशी नियोजन व नियंत्रणाची जरूरी अधिकाधिक भासूं लागली. १९१७ सालच्या रशियन राज्यक्रांतीनंतर नियोजनाचा प्रयोग सरकारमार्फत इतक्या मोठ्या प्रमाणावर सुरू झाला कीं युरोपांतील सर्वच राष्ट्रांचें लक्ष त्यानें आल्या-










कडे वेधून घेतलें. १९२९ च्या आर्थिक मंदीनें जागतिक पुंजीवादाला इतका जबरदस्त धक्का बसला कीं निर्निर्यंत्रित पुंजीवादाचें समर्थन कुणासहि करतां येईना. जर्मनी व जपानमध्यें त्यांतून लष्करशाहीचा उदय झाला, तर अमेरिकेंत प्रेसिडेंट रूझवेल्ट यांना 'न्यू डील'चा प्रयोग करावा लागला. शासनसंस्थेच्या नियंत्रणाचें तत्त्व व समाजकल्याण या तत्त्वांना सर्वत्र मान्यता मिळूं लागली. परंतु रशियाचा किंवा अमेरिकेचा हे दोन्ही प्रयोग भारतासारख्या राष्ट्राला तारूं शकणार नाहींत. एकींत अनुस्यूत असलेलें केंद्रीकरण व दुसरींत अंतर्भूत असलेलें नियंत्रित भांडवलवादाचें तत्त्व हीं दोन्हीं धोक्याचीं असून तीं टाळलींच पाहिजेत.

## केंद्रीकरणाचे धोके

नोकरशाही व हुकुमशाही यांचा विचार करतां लोकशाही समाजवादांत सत्ता व जबाबदारी यांचें विकेंद्रीकरण आवश्यक आहे. तांत्रिक कार्यक्षमता व यांत्रिक विकास यांमुळें उत्पादनसाधनें बहुसंख्य जनतेच्या हातीं न राहातां तीं मूठभर लोकांच्या हातांत गेलीं व त्यांनीं सामान्य जनतेचें शोषण करण्यास प्रारंभ केला. या शोषणापासून बचाव करण्यासाठीं शासनसंस्थेनें हस्तक्षेप करावा अशी मागणी सामान्य जनतेकडून केली जाऊं लागली व या मागणींतूनच क्रमाक्रमानें सर्व उत्पादनसाधनें सामूहिक मालकीचीं असावींत, व सर्व आर्थिक व्यवहारांचें शासनसंस्थेनें नियंत्रण करावें हा विचार पुढें आला. सार्वत्रिक राष्ट्रीयीकरण म्हणजे समाजवाद असें चुकीचें पण फसवें समीकरण मांडण्यांत येऊं लागलें. वास्तविक शासनसंस्था हीच आर्थिक व्यवहारांचें नियमन करणारी एकमेव शक्ति असावी हा विचार लोकशाहीविरोधी आहे. हा विचार फैलावण्यांत साम्यवादाचा हात मोठा आहे. अनियंत्रित भांडवलशाहीविरुद्ध निर्माण झालेल्या सामाजिक प्रतिक्रियेंतून शासनसंस्थेच्या हस्तक्षेपाचें तत्त्वज्ञानच निर्माण झालें. या तत्त्वज्ञानाला मतदानाचा हक्क व जबाबदार राज्यपद्धति यांचाहि लवकरच अडथळा वाटूं लागला व तीं नाहींशीं करून त्यांच्या जागीं साम्यवादानें राजकीय हुकूमशाही निर्माण केली. आर्थिक व राजकीय सत्तेचें आत्यंतिक केंद्रीकरण साम्यवादांत होऊं लागलें व राज्यसंस्था विलयाला जाण्याचें दूरच राहून तिचें सर्वंकष सत्तेंत रूपांतर झालें.

केंद्रीकरणाचा तोच धोका संमिश्र अर्थव्यवस्थेंतहि अंतर्भूत आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शासनसंस्थेच्या हस्तक्षेपाचें क्षेत्र मर्यादित करणें व त्याचवेळीं व्यक्तिसाहसाधिष्ठित उद्योगधंद्यांना वाव देणें हा मिश्र अर्थव्यवस्थेचा मार्ग व अतिरिक्त संपत्तीचा विनियोग राज्यसंस्थेमार्फत करणें हा कल्याणकारी राज्याचा मार्ग हे दोन्हींहि केंद्रीकरणाचा धोका फार काळ टाळूं शकणार नाहींत. राज्यसंस्थेच्या मालकीऐवजीं नियंत्रणाचा उपयोग केल्यानें नोकरशाहीची वाढ होणार आहे व तिचें सामर्थ्य वाढणार आहे. अधिकार गाजविणाऱ्या या नोकरशाहीकडून स्वतःच्या हातांत सत्ता ठेवण्याचे सर्व प्रयत्न होतील व त्यांतून लोकशाहीला व व्यक्तिस्वातंत्र्याला ग्रहण लागण्याचा मोठा धोका आहे.

## विकेन्द्रीकरण व सहकारी पद्धति

म्हणून लोकशाही समाजवादानें विकेंद्रीकरण आणि सहकारी पद्धतीचे व्यवहार यांना महत्त्व दिलें पाहिजे. याचकरतां आर्थिक योजना केवळ सरकारी अधिकारी व तज्ज्ञ यांनीं तयार केलेली नसावी. कामगारसंघटना, सहकारी संस्था, किसान-सभा अशा संघटनांच्या प्रतिनिधींना त्यामध्यें स्थान असावें. राष्ट्रीययोजना वरून लादण्यांत न येतां प्रादेशिक योजनांमधून तयार व्हावी व त्यासाठीं प्रादेशिक नियोजनमंडळें असावींत. धंद्याचें राष्ट्रीयीकरण त्या धंद्याच्या स्वरूपावर व राष्ट्रीय आर्थिक जीवनांतील त्याच्या महत्त्वावर अवलंबून असावें. सहकार्यावर आधारलेलें अर्थशास्त्र समाजवादाचा गाभा आहे. यासाठीं समाजांत अशा सहकारी संस्थांचें जाळें पसरलें पाहिजे. ग्राहकांच्या, उत्पादकांच्या अशा सहकारी संस्थांमार्फत आर्थिक व्यवहार जितके चालतील तितका केंद्रीकरणाचा धोका कमी होईल व समाजजीवनांत उत्स्फूर्त शक्तींचे झरे वाहूं लागतील.

देशांत श्रमशक्ति विपुल आहे, तर भांडवलाचा तुटवडा आहे. यासाठीं श्रमप्रधान अशा लहान प्रमाणावरील उद्योगधंद्यांकडे अधिक लक्ष पुरविलें पाहिजे. छोट्या यंत्रांवर आधारलेली नवी तंत्रव्यवस्था ( Technology ) सुरूं केली पाहिजे

मोठे उद्योगधंदे सरकारच्या मालकीचे केले पाहिजेत; पण तेथें मजूर, व्यवस्थापक व सरकार यांच्या प्रतिनिधींचें सल्लागारमंडळ नेमून त्याला दैनंदिन व्यवहारांत स्वायत्तता दिली पाहिजे. क्रमाक्रमानें

जास्तींत जास्त औद्योगिक विभाग अशा रीतीनें पक्षीय राजकारणाच्या आखाड्याबाहेर ठेवला म्हणजे सरकारी हस्तक्षेपाचा, केंद्रीकरणाचा वगैरे धोके टळूं शकतील. औद्योगिक लोकशाही ही लोकशाही समाजवादाचें फार मोठें अंग आहे राष्ट्रीयीकृत धंद्यांच्या व्यवस्थेंत कामगारांचा वांटा असलाच पाहिजे. कामगारांच्या स्वयं-शासनाच्या हक्काबरोबरच सर्व समाजाचें हित साधलें पाहिजे, म्हणून व्यवस्थापकमंडळांवर व उत्पादन आणि किंमती ठरविणाऱ्या सल्लागार-मंडळांवर ग्राहकांचे प्रतिनिधीहि राहतील.

## शेतकऱ्यांचा प्रश्न

समाजवादी क्रांतीमध्यें शेतकऱ्यांचें काय स्थान आहे हेंच फार काळपर्यंत युरोपांतील मार्क्सवाद्यांना समजलें नाहीं. शेतीचें जसजसें यांत्रिकीकरण होईल तसतसें शेतकरी व कामगार यांमधील भिन्नत्व नष्ट होईल असें त्यांना वाटत होतें. त्यामुळें शेतकऱ्यांच्या प्रश्नांना व संघटनेला दुय्यम स्थान देण्यांत आलें. शेतकऱ्याची मनःप्रवृत्ति संचय व मालकी हक्कांच्या जाणीवेपासून अलिप्त नाहीं म्हणून शेतकरी समाजवादी क्रांतीचा नेता होऊं शकत नाहीं असेंच मार्क्सवादी समाजवाद्यांचें म्हणणें होतें. त्याचे परिणाम क्रांतीच्या दृष्टीनें वाईट झाले. रशियामध्यें सहस्रावधि शेतकऱ्यांना कंठस्नान घालून त्यांच्या रक्तांत शेतकऱ्यांचा विरोध बुडवून टाकावा लागला, तर पश्चिम युरोपांत शेतकऱ्यांचे स्वतंत्र पक्ष निर्माण होऊन कामगारवर्गाच्या ताकतींत फूट पडली. आशियाई समाजवाद्यांनीं ही चूक करतां कामा नये. शेतकऱ्यांबद्दलच्या जबाबदारीची जाणीव भारतीय समाजवाद्यांस सतत राहिली आहे. त्यांच्या दैनंदिन लढ्यांत समाजवाद्यांनीं पुरेपुर भाग घेतला आहे व जमीनदारीचा नाश आणि शेतीमधील सर्वप्रकारच्या मध्यस्थांची व दलालांची हक्कालपट्टी करण्यासाठीं त्यांनीं आंदोलनेंहि केलीं आहेत. शेतकऱ्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्या मालकी हक्कांत समाजवादी हस्तक्षेप करणार नाहींत. सक्तीची सामुदायिक शेती त्यांना पसंत नसून सहकारी शेती हाच शेतीचे प्रश्न सोडविण्याचा उत्तम उपाय आहे असें त्यांना वाटतें. किंबहुना, सारी ग्रामीण अर्थव्यवस्था सहकारी तत्त्वावर उभारण्यांत येईल. खतें, बी-बियाणीं, अवजारें, स्वस्त व्याजानें द्रव्यसाहाय्य व किफायतशीर दरानें शेतकऱ्याच्या धान्याची त्याला विक्री करून देणें वगैरे कामें सहकारी संस्थांमार्फत केलीं जातील. सार्वत्रिक प्रौढ मतदानावर निवडून आलेली ग्रामपंचायत विकेंद्रित राज्यव्यवस्थेचा पाया राहील व तिला गांवासंबंधीं शासनाचे महत्त्वाचे अधिकार राहतील. जमीनीच्या न्याय्य फेरवांटपाच्या भूमिकेवरून समाजवादी भूदान-चळवळीचें स्वागत करतात. सामाजिक एकतेची जाणीव, शासनसंस्थाधिष्ठित प्रयत्नांवर सर्वस्वीं विसंबून न राहतां उत्स्फूर्त प्रयत्नांतून स्वतःची सुधारणा करण्याचा यत्न करणें वगैरे लोकशाही समाजवादाला पोषक अशा प्रेरणा या चळवळीमागें आहेत. भूमि-वितरणविषयक कायद्यांचा मार्गहि या चळवळीमुळें सुलभ होत आहे.

## नैतिक नियमांची प्रेरणा

समाजवाद्यांच्या दृष्टीनें नैतिक नियम हे मानवी, सामाजिक व ऐतिहासिक आहेत. त्यांचा मनुष्याच्या जीवनाशीं संबंध असून त्यांचें मूळ मनुष्याच्या स्वभावांत आहे. ते समाजधारणेचे नियम आहेत व मानवी ज्ञान व अनुभव यांच्या वाढीबरोबर व बदलत्या भौतिक परिस्थितीबरोबर ते परिवर्तन पावत असतात. भांडवलशाही ज्या मनःप्रवृत्ती उत्तेजित करते त्या स्वार्थमूलक व संचयाधिष्ठित असल्यानें समाजहित-विरोधी असतात. त्यामुळें अशा समाजांतील नीति-नियमांत सर्व वर्गांतील नैतिक प्रेरणांचा अंतर्भाव होत नाहीं. मानवी मूल्यांवर आधारलेल्या समाजांत सामाजिक जाणीव ही कोणत्याहि मनुष्याला नैतिक बनविण्यास पुरेशी आहे. पण ज्या समाजांतील सामाजिक कल्पनांवर वर्गीय कल्पनांचा पगडा आहे अशा समाजांत सामाजिक जाणीव टिकवून ठेवण्यासाठीं तिच्यामागें दलित व शोषित वर्गांना न्याय मिळवून देण्याची क्रांतिकारक प्रेरणा पाहिजे. ही प्रेरणा जोरदार नसेल तर मध्यमवर्ग दोलायमान व प्रसंगीं प्रति-क्रांतिकारक विचारांच्या आहारीं जाईल व पीडितवर्ग तात्पुरत्या फायद्यानें मोहित होऊन आपल्या अंतिम व खऱ्या वर्गीय हिताला वंचित होईल. ही क्रांतिकारक प्रेरणा एकाएकीं उत्पन्न होणार नाहीं, किंवा शुष्क तत्त्वचर्चेनेंहि येणार नाहीं. त्यासाठीं पिळवणूकविरोधी लढे व पीडित जनतेची सेवा यांचा प्रदीर्घ अनुभव पाहिजे व बौद्धिक व नैतिक निष्ठा, मानवाबद्दल गाढ








सहानुभूति आणि ध्येयवाद यांची जरूरी आहे.

स्वातंत्र्य, समानता व लोकहित ही समाजवादी नीतीचीं मूलभूत तत्त्वें आहेत. सामाजिक जाणीव, बंधुभाव, व्यक्तीबद्दल आदर, श्रमाची प्रतिष्ठा, राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि आंतरराष्ट्रीय शांतता, सामाजिक न्याय व सार्वत्रिक हित, वैयक्तिक स्वातंत्र्य, खुषीचें सहकार्य या कल्पनांच्या आधारें व्यक्तिगत व सामाजिक जीवनाची घडी बसविणें हें समाजवादी नीतीचें उद्दिष्ट राहील.

समाजवादांत संस्कृति, सुख व आनंद हे कोणत्याहि विशिष्ट वर्गाची मिरासदारी राहणार नाहींत. धनिक लोकांच्या लहरीसमोर किंवा अहंकारापुढें तसेंच सोव्हिएट रशियाप्रमाणें राज्यकर्त्यांची बटीक म्हणून कलेला व साहित्याला वांकावें लागणार नाहीं. 'सत्यं शिवं सुंदरम्' या सूत्रत्रयीला पुढें ठेवून साहित्यनिर्मिति होईल. कला वस्तुस्थितीकडे पाठ फिरवणार नाहीं. ती व्यक्तिगत आणि सामाजिक सत्यांचा पुरस्कार करील. निसर्ग आणि जीवन यांच्यामध्यें समतोल साधणें हें कलेचें ध्येय राहील. कलेच्या व साहित्याच्या कसोट्या व प्रकार राज्यकर्त्यांनीं ठरविण्याला समाजवाद्यांचा सक्त विरोध राहील. कारण, अशा हुकुमशाही प्रथेनें सर्जनशील विचाराच्या विकासाला व सुखाच्या शोधाला अडथळा निर्माण होऊन कलेचा आत्माच मारला जातो.

येथवर प्रबंधाच्या महत्त्वाच्या अंगांची कल्पना दिली. आतां हें स्थित्यंतर घडवून आणण्याकरितां समाजवादी कोणते प्रयत्न करतील, व सत्तासंपादनाचा त्यांचा मार्ग कोणता असेल याचा विचार करूं.

## वर्गलढा, सत्याग्रह व संप

हिंदुस्थान राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झाला असला तरी त्याची समाजरचना अद्यापि वर्गाधिष्ठित व विषमतेवर आधारलेली अशी आहे. त्यामुळें वर्गसंघर्ष अटळ आहे. या संघर्षामध्यें समाजवादी नेहमीं दलितांच्या बाजूनेंच उभे राहतील. राजकीय स्वातंत्र्याचा लढा जितका न्याय्य तितकाच हा वर्गलढाहि न्याय्य आहे असें त्यांना वाटतें. समाजकल्याणकारी राज्याच्या घटनेनें वर्गलढ्याची आवश्यकता फोल ठरविली आहे असें कांहीं लोकांचें म्हणणें असतें. परंतु त्यांना अशा कल्याणकारी राज्यांतील सामाजिक प्रक्रियेचा अर्थच कळलेला नसतो. त्यामुळें वर्गलढा अटळ आहे असें मानल्याशिवाय समाजवाद्यांना पुढें जातांच येणें शक्य नाहीं. मात्र हा लढा सत्याग्रह व संप यांसारख्या मार्गांनीं अहिंसक रीतीनें लढविला पाहिजे असा समाजवाद्यांचा कटाक्ष आहे. ते लोकशाहीवादी आहेत पण वैधानिक मार्ग म्हणजे लोकशाही मार्ग असें ते मानीत नाहींत. गांधीजींनीं लोकशाहीला सत्याग्रहाची जोड देऊन तिच्यांत मौलिक भर घातली आहे असें समाजवादी मानतात. म्हणून समाजवादी विधिमंडळांतील लढ्यांइतकेंच महत्त्व सत्याग्रह व श्रमदानासारखीं विधायक कामें यांना देतात. या सूत्रत्रयीच्या साहाय्यानें ते जनतेचा विश्वास संपादन करूं इच्छितात व त्या विश्वासाच्या जोरावर सत्ता संपादण्याचा यत्न करतात. पार्लमेंटरी लोकशाहीमध्यें पक्षपद्धति अनिवार्य असल्यानें स्वतःच्या पक्षाचें वैशिष्ट्य टिकवून ठेवण्याचा समाजवादी नेहमीं यत्न करतील.

## मार्क्सवादाच्या खोड्यांत

## अडून पडलेला समाजवाद

गया येथें संमत झालेल्या प्रजासमाजवादी पक्षाच्या प्रबंधाचें स्वरूप हें असें आहे. लेखाच्या सुरवातीस म्हटल्याप्रमाणें बहुतेक विवेचन मार्क्सवादी दृष्टिकोनांतून झालें आहे. वर्गलढ्याविषयींचें तर सारें विवेचन दहाबारा वर्षांपूर्वीं पक्षांत होत असे तसें झालें आहे. सांप्रतचा समाज वर्गाधिष्ठित आहे व वर्गांचे हितसंबंध भिन्न व परस्परविरोधी असतात, इतकें सर्वसामान्य विधान मान्य होण्यासारखें आहे. पण याच्यापुढें जाऊन केवळ दोन वर्गांमध्येंच तें भिन्नत्व असतें असें म्हणतां येणार नाहीं. 'Class Conflicts' पेक्षां 'Group Tensions' हा शब्द वस्तुस्थितीचें अधिक यथार्थ वर्णन करतो. हे समूह किंवा ग्रूप्स् अनेक असूं शकतात व कम्युनिस्ट मानतात त्या दोन्हीं वर्गांमध्यें असूं शकतात. एकसंध शोषक वर्ग व एकसंध शोषित वर्ग असे वर्ग समाजांत नाहींत. मालकी आणि नियंत्रण (Ownership and Control) यांच्या फारकतीमुळें वर्गविग्रहाचें मार्क्सवादी सांच्याचें विवेचन २० व्या शतकांतील भांडवलशाहीच्या अवस्थेला लागू पडणारें नाहीं. आर्थिक नियोजनामुळेंहि अर्थव्यवस्थेच्या निरनिराळ्या विभागांवर व समाजांतील निरनिराळ्या थरांवर कमी-अधिक परिणाम होत असतात. अशा वेळीं वर्गांची ठोकळेबाज कल्पना समाजवाद्यांना बाळगून चालत नाहीं. अन्याय होणाऱ्या विशिष्ट

समूहाची बाजू घेऊन त्यांचें नेतृत्व करावें लागतें. ( Economic planning impinges upon different sections and sectors to varying degrees. A socialist must choose from those sections and sectors his allies on the basis of an objective assessment of the incidence of planning. )

शेती, उद्योगधंदे याविषयींच्या निवेदनांत नवीन असें कांहीं नाहीं. सहकारी अर्थशास्त्र, छोटी यंत्रसामग्री व विकेंद्रीकरणावरील भर हाहि समाजवादीपक्षाच्या आर्थिक कार्यक्रमांतील जुना भाग आहे. विद्यमान प्रश्नांवर जे उपाय या नव्या प्रबंधांत सुचविण्यांत आले आहेत ते जुनेच आहेत. त्या प्रश्नांची उपपत्ति लावण्याची पद्धत मात्र मार्क्सवादी आहे. ह्या विवेचनपद्धतींतून निघणारे निष्कर्ष तपासून मगच ते समाजवाद्यांनीं स्वीकारले पाहिजेत. जागतिक समाजवादाच्या तत्त्वज्ञानांत भारतीय समाजवाद्यांनीं आजवर मोलाची भर घातली आहे. त्यांनींच पुन्हां मार्क्सवादाच्या खोड्यांत अडकून पडावें ही घटना लोकशाही समाजवादी चळवळीच्या भवितव्याच्या दृष्टीनें चांगली नाहीं.

## नव चिंतनाची आवश्यकता

श्री. नेहरू यांनीं दिल्ली येथें ४ मार्च, १९५६ रोजीं 'फेडरेशन ऑफ इंडिअन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्री 'च्या २९ व्या वार्षिक अधिवेशनाचें उद्‌घाटन करतांना एक महत्त्वाचें भाषण केलें. त्यांतील पुढील कांहीं भाग उद्धृत केला आहे :

" एक विचारपद्धति अशी कीं ती सदैव स्थिरच राहाते, जुन्या विचारांच्या वळणांची चाकोरी ती सोडूं शकत नाहीं. दुसऱ्या प्रकारची विचारपद्धति ही सदैव बदल होण्याच्या परिभाषेंत विचार करीत असते. या दोन्ही विचारपद्धति आवश्यक आहेत. एका बाजूनें जग झपाट्यानें बदलत असतांना आपण आपली विचारपद्धति तेवढीच कायमची स्थिर राखूं शकणार नाहीं. उलट पक्षीं जे स्वतःला मोठे क्रांतिकारक म्हणवितात, ते बदलत्या घडामोडींत कोणतातरी एकांतिक दृष्टिकोण उराशीं बाळगून वावरत राहाण्याचाहि धोका असतो. जो कधीं बदलत नाहीं असा स्थितिप्रिय माणूस हा प्रतिगामी असतो. पण त्याबरोबरच आपल्याला क्रांतिकारक समजणारे लोकहि तितकेच प्रतिगामी असूं शकतात. कोणत्यातरी एका कल्पनेला ते चिकटून बसतात आणि जग बदलत आहे हें ते पार विसरून जातात. अत्यंत विकसित देशांतील आजची भांडवलशाही ही पन्नास वर्षांपूर्वीच्या भांडवलशाहीहून अगदीं भिन्न आहे. तिच्या स्वरूपांत संपूर्ण बदल झालेला आहे. अगदीं भांडवलशाही असें राष्ट्र घेतलें तरी त्यांतहि समाजवादी स्वरूपाचे बदल घडून येत आहेत. आधुनिक समाजांत असें घडणें हें अपरिहार्यच आहे.

" सोव्हिएट यूनियनमध्यें कांहीं महत्त्वाचे बदल होत आहेत. सोव्हिएट यूनियनच्या धोरणाला नवें वळण दिलें जात आहे. या बदलाचा तपशील किंवा होणारा बदल चांगला कीं वाईट हेंहि मला सांगायचें नाहीं. मला एवढेंच दाखवावयाचें आहे कीं आर्थिक उपपत्तीबाबत सांप्रदायिक आग्रह धरणाऱ्या देशांतहि, परिस्थितीनें बिनतोड पेंच आणून त्या देशाला आपला आग्रही दृष्टिकोण बदलण्यास भाग पाडलें आहे. त्या देशानें काय बदल केला किंवा काय केला नाहीं, हें महत्त्वाचें नाहीं. पण विविध प्रश्नांबाबत एकच जडवत् साचेबंद आग्रह धरून चालण्यासारखें नाहीं, याची जाणीव त्या देशाला झाली हें महत्त्वाचें आहे. नव्या चिंतनपद्धतीची आवश्यकता असलेल्या जगांत आपण सध्यां राहात आहोंत हें आपण ओळखलें पाहिजे. अर्थात कांहीं तत्त्वें आणि अनुभव यांवर आपलें चिंतन आधारलेलें असलें पाहिजे. पण हें चिंतन अगदीं नव्या मापाचें, निराळ्या पातळीचें असणें अवश्य आहे हें आपण ओळखलें पाहिजे. विचाराचा बदल हा केवळ परिमाणमूलक नव्हे तर गुणमूलक झाला पाहिजे.

" प्रत्येकाला सारखी संधि मिळाली पाहिजे. कांहीं लोक त्या संधीचा इतरांहून अधिक उपयोग करूं शकतील, पण सर्वांना समान संधि मिळाली पाहिजे. हें भारतापुरतेंच खरें आहे असें नसून सर्व जगाला हा नियम लागू आहे. जगाच्या एका भागांत अत्यंत संपन्नता तर दुसऱ्या भागांत कमालीचें दारिद्य व दुःख असें जगाचें स्वरूप फार काळ टिकणें शक्य नाहीं. ही परिस्थिति पूर्वी टिकूं शकली तरी आतां जग पूर्वीहून अधिक जवळजवळ आलें आहे. एकीकडच्या रोग दुसरीकडे चटकन फैलावत असून विषमतेवर उपाय शोधणें जिव्हाळ्याचें झालें आहे. याला कांहीं वेळ लागेल. पण जगाच्या एखाद्या भागांत जीवनाच्या आवश्यक गरजाहि भागत नाहींत व दुसऱ्या भागांत चंगळ आहे, अशी परिस्थिति राहिली तर जगांत फार मोठा अनर्थ माजण्याचा संभव आहे. यामुळें ..."








श्री. अ. ज. करंदीकर

# देवपुत्र कनिष्काचा पुराणोक्त इतिहास

## योगिनींचीं महापीठें

येथें आतां बौद्ध योगिनींच्या महापीठांची थोडी माहिती सांगितली पाहिजे. बौद्ध तंत्रांप्रमाणें कामरूप, पूर्णगिरी, उड्डियान आणि जालंधर हीं त्यांच्या योगिनींचीं चार महापीठें होतीं. पण भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें पाहिल्यास शककुषाणादि आक्रमकांचीं परदेशांशीं दळणवळण ठेवण्याचीं हीं प्रमुख केंद्रें होतीं. उड्डियान हें एका बाजूनें बल्ख आणि समर्कंद या प्रांतांशीं आणि दुसऱ्या बाजूनें पामीर, खोतान, काशगर या प्रांतांशीं संबंध ठेवण्याचें प्रमुख केंद्र असून तें अखंड भारताच्या सीमाप्रांतांतील स्वात नदीच्या खोऱ्यांत होतें. जालंधर नगराकडून शिपकीच्या घाटांतून तिबेटाकडे जाण्याचा राजमार्ग होता. कामरूप अथवा आसाम हें पूर्वभारतांतील देशद्रोही मोंगोलियनांचें भारताबाहेरील मोंगोलियनांशीं संबंध ठेवण्याचें केंद्रस्थान पूर्वीं होतें आणि आतांहि आहे. पूर्णगिरी कोठें होतें हें मात्र आज सांगतां येत नाहीं. असल्या महत्त्वाच्या केंद्रांतून बौद्ध योगिनींचीं महापीठें स्थापून मोंगोलियन वंशाचे कुषाण नेते भारतावर आपलें सांस्कृतिक आणि राजकीय अधिराज्य प्रस्थापित करूं पहात होते. ही केवळ माझी स्वतःची कल्पना नसून कुषाणकाळांत भारतामध्यें चीनाचार म्हणजे वस्तुतः चीनमधील लाओत्से या आचार्यांच्या टाओ नामक गुप्त पंथांतून प्रचलित असलेले अनाचार रूढ करून येथील आर्यांना पीतवर्णी वंशाचें दास्य स्वेच्छेनें स्वीकारावयाला लावण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालू होता. इतकेंच नव्हें तर असल्या प्रचाराला बळी पडून पूर्णपणें चिनी बनलेल्या पंजाबच्या एका भागाला तेव्हां चीनभुक्ति म्हणजे चिनी प्रांत हें नांवहि चिकटलें होतें, असें युआन् च्वांगच्या ग्रंथावरून समजतें. असल्याच मोंगोलियनांचे दास बनलेल्या भारतीयांमध्यें गुह्यसमाजासारखीं ओंगळ तंत्रें निर्माण झालीं. खरें म्हणजे या विशिष्ट दृष्टीनें तारायंत्र, महाचीनक्रम, कुब्जिकाम्नाय, गुह्यसमाज, जयद्रथयामल, कुलालिकातंत्र इत्यादि वज्रयानी तंत्रांचा बौद्ध वाङ्मयाच्या हिंदु अभ्यासकांनीं समाचार घ्यावयाला पाहिजे. उदाहरणार्थ, तारातंत्रांत असें सांगितलें आहे कीं एकदा बुद्धदर्शनासाठीं उत्सुक झालेला वसिष्ठ भारत आणि तिबेट या दोनहि देशांत बुद्धाचा शोध न लागल्यामुळें चीनला गेला असतां तेथें बुद्धानें त्याला चिनी पद्धतीनें तारादेवीची उपासना करण्याचा विधि सांगितला. याचा ऐतिहासिक अर्थ इतकाच कीं आगाखानी मुसलमान जितक्या कुटिलपणानें आपल्या पंथाचा प्रसार करण्याकरितां कलंकीच्या नांवाचा दुरुपयोग करतात, तितक्याच कुटिलपणानें तेव्हांचे चिनी प्रचारक आपल्या अनाचारांचा प्रचार करण्याकरितां वसिष्ठादिकांच्या नांवांचा दुरुपयोग करीत असत. हिंदु संशोधकांच्यामध्यें एकट्या डॉ. विनयतोष भट्टाचार्यांनीं मोंगोलियनांच्या या ओंगळ प्रचारावर प्रकाश टाकला आहे. अनंगवज्र नामक भिक्षूच्या 'प्रज्ञोपायविनिश्चयसिद्धि' या डॉ. भट्टाचार्यांनीं संपादिलेल्या ग्रंथांत पुढील मुक्ताफळें आढळतातः "प्रज्ञापारमिता सेव्या सर्वथा मुक्तिकांक्षिभिः। परमार्थे स्थिता शुद्धा संवृत्या तनुधारिणी ॥ ललनारूपमास्थाय सर्वत्रैव व्यवस्थिता। अतोऽर्थं वज्रनाथेन प्रोक्ता बाह्यार्थसंभवा ॥ जनयित्रीं स्वसारं च स्वपुत्रीं भागिनेयिकाम्। कामयन् तत्त्वयोगेन लघु सिध्येत साधकः ॥". बुद्ध ज्या शाक्य-कुलांत जन्माला आला, त्या कुलांत

या विषयावरील लेखाचा पूर्वार्ध 'नवभारता'च्या मागील म्हणजे मार्चच्या अंकांत आला आहे. प्रस्तुत भाग हा उत्तरार्ध आहे. --कुषाणसम्राट् कनिष्क हा गौतम बुद्धाप्रमाणेंच मोंगोलिअन वंशांतला असून पुराणांत वर्णिलेला बाणासुर व जालंधर दैत्य हा कनिष्कच होय, या कनिष्काची राजधानी जालंधर ही बौद्धयोगिनीगणसेवित, सनातन-हिंदुधर्मविरोधी असें केंद्र होतें असें पूर्वार्धांत लेखकानें मांडलें आहे.--



अनुक्रमणिका








भगिनीशीं विवाह करण्याची पद्धति रूढ होती, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्याच्या अनुयायांत अनंग-वज्रासारखे लेखक निघणें आणि त्यांनीं कनिष्ककालीं नवीनच रूढ झालेल्या प्रज्ञापारमिताशास्त्रांची अशी शोभा करणें अगदीं स्वाभाविक आहे. या ओंगळ श्लोकांचा आध्यात्मिक अर्थ वेगळा आहे, असें तज्ज्ञ लोक सांगतात. पण ज्यांना आपलें अध्यात्म या भाषेंत प्रकट करावेंसें वाटतें, त्यांनीं आणि त्यांच्या अनुयायांनीं सामान्य जनतेंत आपल्याविषयीं कांहीं अप्रिय समजुती रूढ झाल्या तर त्याचा विषाद मानण्याचें कारण नाहीं. डॉ. विनयतोष भट्टाचार्यांना तर या मोंगोलियन भिक्षूंच्या बीभत्स प्रचारांचा आणि आचारांचा इतका उद्वेग आला कीं त्यांचा सरसकट संहार करून भारतांतील हीं अनाचाराचीं केंद्रें समूळ नष्ट करण्याबद्दल त्यांनीं मुसलमानांना पर्यायानें धन्यवादच दिले आहेत: ' The Muhammadans with one stroke of their sword purged India for good of these horrible priests of immorality and lawlessness by killing every monk they could meet on the streets '. असलीं विधानें करून त्यांनीं संशोधनात्मक लेखनाच्या मर्यादांचें अतिक्रमण केल्याबद्दल इतर हिंदु संशोधकांनीं डॉ. भट्टाचार्यांना दोष दिला आहे, हेंहि इथें सांगितलें पाहिजे.

असल्या तंत्रांना अनुसरणाऱ्या बौद्ध योगिनींचीं वर्णनें वाचलीं म्हणजे कै. चित्तरंजन दास यांनीं वारविलासिनीला दिलेली योगिनी ही संज्ञा अगदीं यथार्थ आहे असें वाटतें. या योगिनींना सरसकट लामा ही संज्ञा लावीत असत आणि त्यांचें कार्य म्हणजे विरोधी पंथांतील तरुणांना आपल्या जाळयांत पकडून त्यांना ताटाखालचें मांजर बनविणें हेंच होतें. या लामायोगिनींपैकीं कांहीं ' आलापेनापि चुंबति । चुंबिका सा तु विज्ञेया योगिनीबलदर्पिता ॥ ' म्हणजे प्रथमालापाच्या क्षणींच चुंबन घेणाऱ्या आणि योगबलानें उद्दाम झालेल्या अशा असल्यानें त्यांना 'चुंबिका' म्हणत असत. कांहीं ' हसते रमते चैव मार्गमाक्रम्य तिष्ठति ' या कोटींतल्या असल्यानें त्यांना इंग्रजींतील ' Street walker ' हीच संज्ञा देणें योग्य होईल. असल्या योगिनींचा पुरेसा अनुभव असल्यामुळें अनिरुद्धहरणानंतर हरिवंशकारांनीं कृष्णाच्या तोंडीं पुढील उद्गार घातले आहेत: " दैत्यदानवांच्या स्त्रिया पुंश्चली आणि मायासंपन्न असल्यामुळें अनिरुद्धाला त्यांनींच पळवून नेलें असावें, याविषयीं संशय नाहीं. " अनिरुद्धाला पळवून आणणारी उषेची सखी चित्ररेखा ही जशी अप्सरा होती, तशीच योगिनीहि होती, असें हरिवंशानें स्पष्ट सांगितलें आहे. कृष्ण आणि बाणासुर यांच्या युद्धांत, शंकरानें ज्या लंबादेवीला बाणाच्या संरक्षणार्थ भवानीच्या सांगण्यावरून पाठविलें, ती लंबादेवी वर उल्लेखिलेल्या लामायोगिनींपैकींच असावी. ' ततस्त्वक्षो वचः श्रुत्वा देवीं लंबामथाब्रवीत् । गच्छैहि लंबे शीघ्रत्वं बाणसंरक्षणं प्रति ॥ " असो.

## कनिष्काला बलिपुत्र बाणासुर कां बनविलें ?

मत्स्य आणि हरिवंश या पुराणांनीं कनिष्काला बाणासुर आणि बलिपुत्र कां बनविलें, याचा उलगडा भविष्यपुराणांतील पुढील आख्यानानें होण्याजोगा आहे. " कलिर्भास्करमाराध्य तपसा ध्यानतत्परः । पंचवर्षांतरे सूर्यः तस्मै च कलये मुदा ॥ शकाख्यं नाम पुरुषं ददौ तद्भक्तितोषितः । तदा प्रसन्नः स कलिः शकाय च महात्मने । तैत्तिरं नगरं प्रेम्णा ददौ हर्षित–मानसः ॥ तत्र गोपान् दस्युगणान् वशीकृत्य महाबली । आर्यदेशविनाशाय कृत्वोद्योगं पुनः पुनः । हतवान् भूपतीन् बाणैस्तस्मात् ते स्वल्पजीविनः ॥ " म्हणजे 'कलीनें पांच वर्षेंपर्यंत मनःपूर्वक सूर्योपासना केल्यानंतर सूर्यानें त्याला शक नामक पुरुष दिला. हा पुरुष कलीच्या अगदीं मनासारखा असल्यामुळें त्यानें हर्षभरानें त्याला तैत्तिर नगर दिलें. तिथें गोप आणि दस्यु यांना एकत्रित करून त्या महाबली शकानें आर्यदेशविनाशार्थ पुनः पुनः आक्रमणें आरंभिलीं आणि आर्यभूपतींचा बाणांनीं संहार केला, त्यामुळें ते सारे अल्पायु झाले. ' या अवतरणावरून शकस्थान अ[illegible] तार्तारी ( तैत्तिर ) येथील शककुषाणांनीं [illegible] पूर्वी आणि विनाशार्थ पुनः पुनः चालविलेल्या अ[illegible] आर्यदेशा-भविष्यपुराणकारांना किती विश्वसनीय माहि[illegible] याची आधुनिक इतिहासकारांना थोडीफार [illegible] आक्रमणांची कल्पना येईल. या आक्रमकांचें प्रमुख शस्त्र [illegible] होती, बाण असल्यामुळें आपल्या पुराणकारांनीं [illegible] तरी बाणासुर बनविलें आहे. या बाणासुराला बलि[illegible] त्य[illegible] ना बनविण्याचें आणखी एक कारण येथें सांग[illegible] पुत्र [illegible] तोगें



अनुक्रमणिका







आहे. पद्मपुराण, विष्णुधर्मोत्तर पुराण इत्यादि ग्रंथांतून बलीला बाष्कली अशी संज्ञा दिलेली आढळते. ही संज्ञा पूर्व इराणांतील बाष्कल खोऱ्यावरून आणि तेथील बाष्कली भाषेवरून उद्भवलेली दिसते. भारतांत येण्यापूर्वी स्वतः कनिष्क त्याच प्रांतांत रहात असल्यामुळें 'मंजुश्रीमूलकल्प' या बौद्धग्रंथांतील त्याच्या वर्णनांत 'काश्मीरद्वारपर्यंतं बष्कलाद्यं सकापिशम् । योजनशतसप्त तु राजा भुंक्तेऽथ भूतलम् ॥' म्हणजे बष्कलापासून प्रारंभ करून कापिश प्रांतासह काश्मीर-द्वारापर्यंतच्या अर्थात् जम्मूपर्यंतच्या राज्याचा हा राजा उपभोग घेईल, असा निर्देश आला आहे. या बाष्कली कनिष्काच्या साम्राज्यविस्ताराच्या मानानें त्याचें सैन्य अगदीं मर्यादित दिसतें. "सप्तसप्तति सहस्राणि लक्षौ द्वौ तस्य भूपतेः । भविष्यति न संदेहो तस्मिन् काले युगाधमे ।" या बौद्ध संस्कृतांतील श्लोकावरून असें समजतें कीं त्याच्या सैन्यांत दोन लक्ष पायदळ आणि ७७००० स्वार होते. कै. काशीप्रसाद जायस्वाल यांना या आंकड्यांचा बोधच झाला नव्हता. पण मीं वर सुचविलेला अर्थ व्हिन्सेंट स्मिथच्या माहितीशीं सुसंगत आहे. त्यांनीं असें सांगितलें आहे कीं युएची गण चीनच्या परिसरांतून बाहेर पडला, तेव्हां त्यांत एक लक्षापासून दोन लक्षांपर्यंत धनुर्धारी वीर होते. त्याचप्रमाणें कनिष्कापूर्वीच्या कुषाण राजानें चीन-वर स्वारी करण्याकरितां सत्तर सहस्र घोडदळ धाडलें होतें. तेव्हां 'मंजुश्रीमूलकल्प'कारांनीं निस्संदेह म्हणून सांगितलेल्या माहितींत बरेंच तथ्य दिसतें. युएची-सारख्या एका क्षुद्र गणाला भारतासारख्या विस्तीर्ण देशावर आक्रमण करण्याचें धाडस कसें झालें, हें सांगतांना 'हू हान शू' या तत्कालीन चिनी ग्रंथाच्या कर्त्यांनीं पुढील मननीय उद्गार काढले आहेत. "Its sont plus baible que Les Youetehe; its pratiquent be religion du Buddhe; aussi est devenu chez euse une habitude de ne pas tuer et de ne pas batailler." म्हणजे 'भारतीय लोक युएचींच्या मानानें दुर्बल आहेत, कारण ते धर्मानें बौद्ध असल्यामुळें हल्ला न करण्याची आणि युद्धेंहि न करण्याची त्यांना सवयच लागून गेली आहे. त्यामुळें क्षुद्र टोळयांनासुद्धां भारतावर आक्रमणें करतांना फारसें भय वाटत नसे.' अशोकपंथी राजकारणाचे आणि धर्म-प्रचाराचे हे स्वाभाविक परिणाम असल्यामुळें त्यांच्यावर अधिक टीका करण्याची आवश्यकता नाहीं. मात्र असली मूल्यवान् समकालीन माहिती अधिकारी विद्वानांच्या ग्रंथांतून जोंपर्यंत उपलब्ध होत नाहीं, तोंपर्यंत माझ्यासारख्या अनधिकारी व्यक्तीलाहि या विषयावर लेखणी चालविणें भाग आहे. बौद्ध धर्माच्या प्रसारामुळें विदेशी विजिगीषूंना भारतांत मुक्तद्वार लाभत असल्यामुळें मेनांद्रसारखे सुसंस्कृत ग्रीक आणि कनिष्कासारखे महाधूर्त मोंगोलियन सम्राट् आपल्या साम्राज्यांतील बौद्धपंथी जनतेचा शक्य तितका पाठ-पुरावा करीत असत. असल्या विदेशी सम्राटांच्या प्रलोभनांना देशांतील इतर नीच आणि देशद्रोही लोक बळी पडले तरी यौधेयत्रिगर्तादि मानधन गणांना ते कधींच वश करून घेऊं शकले नाहींत. हे गण आपल्या सनातन परंपरेपासून कधींच च्युत झाले नाहींत, म्हणूनच शककुषाणांच्या भीषण आक्रमणांतून आत्म-संरक्षण करून घेऊन ते हिंदुत्वाचा आणि भारताचा पुनरुद्धार करण्याला समर्थ झाले.

### कनिष्क आणि गणेशोपासना

या यौधेयांना वश करून घेण्याकरितां आपण स्वतः-च, त्यांचा देव जो स्कंदकार्तिकेय, त्याचा धाकटा भाऊ बनण्याचा अगदीं अपूर्व उपाय कनिष्कानें शोधून काढला. हा उपाय इतका अपूर्व होता कीं आजपर्यंत कोणाहि इतिहासकाराला कनिष्काच्या या अद्भुत कर्तृत्वाची कल्पनासुद्धा आलेली नाहीं आणि त्यामुळें त्यांना हुविष्क राजाच्या नाण्यावरील धनुर्धारी गणेश देवतेचा अद्यापि बोध झालेला नाहीं. कनिष्क राजा आपल्या राजवटीच्या प्रारंभीं बौद्ध धर्माला अनुकूल नव्हता, अशी तिबेटी परंपरा आहे. तो स्वतःला कार्तिकेयाचा धाकटा भाऊ म्हणवून घेत होता, असें हरिवंशांतील वर उतरून घेतलेल्या श्लोकांवरून समजतें. 'प्रमथगणवंशस्य प्रथमः स्यामहं विभो' म्हणजे 'तुझ्या गणांचें प्रमुखपद मला लाभूं दे' असा वर बाणानें शंकरापाशीं मागितला होता, असेंहि हरिवंशकारांनीं सांगितलें आहे. बाणासुराला देवपद प्राप्त झालें, असें त्याची चतुर्भुज मूर्ति उपलब्ध झाल्याचें वृत्त पुराणवस्तुसंरक्षकविभागा-








च्या १९०६ च्या प्रतिवृत्तांत आल्यावरून समजतें. या चतुर्भुज बाणासुराचें लिंग इतकें स्पष्ट दिसत आहे कीं तेवढ्यावरून डॉ. ब्लोक आणि मौलवी कुरेशी यांच्यासारख्या अहिंदु अधिकाऱ्यांनासुद्धां ही मूर्ति लिंगपूजकांच्या पंथांतील असल्याचें सहज कळून आलें. तरीसुद्धां केवळ चार भुजांच्या सादृश्यावरून ती मूर्ति चतुर्भुज विष्णूचीच असली पाहिजे, असें कांहीं हिंदु संशोधकांनीं आग्रहानें प्रतिपादिलें आहे. पण 'चत्वारोऽस्य भुजाः शिष्टा भविष्यन्त्यजरामराः । पार्षदमुख्यो भवतो न कुतश्चिद्भयोऽसुरः ' असा भागवतांत सांगितल्याप्रमाणें विष्णूनें बाणाला वर दिला असल्याची परंपरा या हिंदु संशोधकांना विदित असल्याचीं लक्षणें दिसत नाहींत. बाणासुराची वर उल्लेखिलेली मूर्ति गुप्तकालाच्या प्रारंभींची म्हणजेच कुषाणसाम्राज्याच्या शेवटच्या दिवसांतली आहे, असें तज्ज्ञ सांगतात. कनिष्कानंतरचा कुषाण सम्राट् हुविष्क याच्या कांहीं दुर्मिळ नाण्यांवर धनुर्धारी बाणासुराची प्रतिमा असून तिच्या शेजारीं प्राचीन ब्राह्मी लिपींत गणेश हीं अक्षरें कोरलेलीं आहेत. 'One unique copper-coin of Huvishka has the figure of an archer standing right holding a bow as long as himself, with string inwards, legend right in peculiar characters which look like old Brahmi for Ganesha.' ( व्हिन्सेंट स्मिथचा नाण्यावरील प्रबंध ). या मुद्रेंतील धनुर्धारी प्रतिमेला नाणें पाडणाऱ्यानें गणेश म्हटलें असलें तरी हरिवंश आणि भागवत या पुराणांतील कनिष्कबाणासुराच्या आख्यानाशीं अपरिचित असलेले सारे अधिकारी संशोधक हा खरोखरीचा गणेश नसून वस्तुतः आकाशांतील मृगावर बाण सोडणारा रुद्र-लुब्धकच असला पाहिजे, असें आग्रहानें प्रतिपादीत आहेत. कनिष्क राजा हा भारताच्या वायव्यसीमेवरील सारीं गणराज्यें जिंकून खरोखरीच गणेश बनला होता, याची या संशोधकांना कल्पनाहि नाहीं. कनिष्क राजा स्वतःला गणेश म्हणवीत असल्यामुळें आर्यदेव नांवाच्या एका बौद्ध भिक्षूनें त्याला टोमणा मारला होता कीं तूं वस्तुतः गणाचा दास असून उगीच ऐट कां करतोस ? पण ही ऐट तो मुख्यतः राजकीय कारणांकरितांच करीत होता, हें गणेशाच्या उत्क्रांतीवरून तज्ज्ञांना सहज समजण्याजोगें आहे. आपली पौराणिक परंपरा असें सांगते कीं गणेश हा प्रथम मनुजमुखीच होता, पण एकदां रागानें शिवानें त्याचें शिर कापलें आणि मग पार्वतीच्या विनंतीवरून उत्तरेकडे डोकें ठेवून निजलेल्या गजासुराचें शिर कापून त्यानें तें गणेशाला चिकटविलें. सुप्रसिद्ध संशोधक प्रो. स्टेन कोनोव ( स्तेन कव्न ) यांनीं आपल्या कनिष्कावरील लेखांत अशी माहिती पुरविली आहे कीं तार्तार युएचीच्या ज्या टोळीनें भारतांत साम्राज्य स्थापिलें तिला तत्कालीन खरोष्ट्री लेखांतून आणि तिबेटी परंपरांतून गज या नांवानें संबोधिलें आहे. मिर्झा हैदरच्या मोंगलांच्या इतिहासांत, किंवा शम्स उल उलेमा गनी यांनीं अजमीरच्या खाजा चिश्तीवर नागपूर विद्यापीठाच्या पत्रिकेंत लिहिलेल्या लेखांतहि या तार्तार गजांचा उल्लेख आलेला आहे. तेव्हां कनिष्काच्या मृत्यूला कांहीं काळ लोटल्यानंतर गणेशाचें मनुजमुख लुप्त होऊन त्या ठिकाणीं गजटोळीच्या गज-मुखाची स्थापना झाली, हें उघड आहे. या गजमुखाचें वाहन मूषकच कां, याचाहि उलगडा कनिष्काच्या इतिहासावरूनच होऊं शकतो. कारण कनिष्काच्या काळीं उत्तर सिंधप्रांताला मूषिक जनपद म्हणत असत, हें मी वर दाखविलेंच आहे. या मूषकांचें गजांशीं विशेष सख्य असल्यानें गणेश जेव्हां गजमुख बनला, तेव्हांच त्याचें वाहन म्हणून मूषकहि त्याच्या शेजारीं येऊन बसला. या साऱ्या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे आपल्या गणेशोपासनेशीं कनिष्काचा आणि त्याच्या वंशाचा अतिशय निकटचा संबंध असल्याचें उघडकीस येतें. युएचींच्या पांच टोळ्या असल्यानें अगदीं आरंभीं गजाननाला पांच सोंडा असत.

कनिष्कानें जेव्हां आपण कार्तिकेयाचे कनिष्ठ बंधु असल्याचा प्रचार आरंभिला, तेव्हां शंकराला स्कंदावांचून अन्य पुत्र लाभला नव्हता, ही महत्त्वाची गोष्ट आपल्या अधिकारी इतिहासलेखकांच्या ध्यानींमनींसुद्धां नसेल. नाहींतर त्यांनीं 'उमावृषांकौ शरजन्मना यथा यथा जयंतेन शचीपुरंदरौ ' असल्या ओळींतून एकुलता एक पुत्र असलेल्या इंद्राच्या पंक्तींत शंकराला बसविणाऱ्या कालिदासाला कनिष्कोत्तरकालीन ठरविलेंच नसतें. ऋग्वेदांत ' गणानां त्वा गणपतिं हवामहे ' असें









ब्रह्मणस्पतीला म्हटलें असलें, किंवा अथर्वशीर्ष उपनिषदांत विनायक देवतेचा उल्लेख आढळत असला तरी ब्रह्मणस्पतीसारखी मंगलदेवता आणि विघ्नराज-विनायकासारख्या उग्रदेवता यांचें एकीकरण होऊन शंकराचा पुत्र या नात्यानें आणि गणेश-गजाननादि नांवांनीं मंगलमूर्तीची सध्या चालू असलेली उपासना कुषाण काळांतच प्रथम चालू झाली. 'साम्राज्ययुग' लिहिणाऱ्या अधिकारी इतिहासलेखकांनींहि गजाननासंबंधीं लिहितांना असेंच म्हटलें आहे कीं, 'His real popularity came slightly later.' म्हणजे त्याच्या खऱ्या लोकप्रियतेचें युग कुषाणांच्या अंतानंतर लौकरच आलें. भारतांत गजाननाची उपासना लोकप्रिय होण्याचा काळ त्यांनीं इतका अचूक सांगितला असूनहि ऐतिहासिक दृष्टीच्या अभावीं देवपुत्र कनिष्क हाच पहिला गणेश आणि आपल्या प्रचलित गणेशपुराणांतील गुणेश देवाचा कट्टा शत्रु होता, याची त्यांना कल्पनाहि आलेली नाहीं. फार काय भाद्रपद शुद्ध चतुर्थी ही एक विनायकी चतुर्थी असून त्या दिवशीं ज्या विघ्नहर्त्या, बुद्धिदात्याची जयंती आपण साजरी करतों, त्याचें नांव गणेश नसून गुणेश आहे, किंवा रामदासांच्या भाषेंत तो 'ईश सर्वां गुणांचा' आहे, याची कोणाला आठवणहि नसते. या गुणेशानें ज्या सिंधु असुराला मारण्याकरितां अवतार धारण केला होता, त्या असुरानें 'ममैव प्रतिमां कृत्वा पूजयन्तु गृहे गृहे' म्हणजे 'माझीच प्रतिमा करून तिची घरोघरीं पूजा करीत जा' असा आपल्या प्रजेला आदेश देऊन त्याची बजावणीहि कडक रीतीनें चालविली होती, असेंहि गणेशपुराणकारांनीं सांगितलें आहे. या उल्लेखावरूनहि देवपुत्र कनिष्कानें स्वतःच्या गणेश या नांवानें प्रतिमा करवून त्यांची उपासना कशी प्रचलित केली, या घटनेवर पुरेसा प्रकाश पडतो. राजाच्या मूर्तीची पूजाअर्चा करण्याची कल्पना आज आपल्याला चमत्कारिक वाटत असली तरी पूर्वीं ती अनेक देशांतून रूढ होती. स्वतः कनिष्काच्या काळीं रोमच्या सम्राटांच्या मूर्तीची पूजाअर्चा होत असे. या रोमन सम्राटांची 'कायसर' ही पदवीहि कनिष्क कुलांत प्रचलित होती. कदाचित् त्यांच्या उदाहरणावरूनहि कनिष्काला ही कल्पना सुचली असावी.

गणेशपुराणकारांच्या मताप्रमाणें महोत्कट विनायकाचा अवतार हा देवांतक आणि नरांतक या असुरांचा कांटा काढण्याकरितां झाला होता. यांपैकीं देवांतक हे बौद्ध होते आणि नरांतक म्हणजे चंगीजखान आणि तैमूरलंग यांचे जे पूर्वज कुषाणकाळांत भारतावर राज्य करीत होते, तेच होते. यांची सारी संस्कृति ही भूतसंस्कृति म्हणजे भूटियालोकांची संस्कृति होती, असें गणेशपुराणकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे. त्या काळीं सिद्ध नागार्जुनासारखी अलौकिक भारतीय व्यक्तिसुद्धां भोट देशांतील संस्कृतीचा भारतांत प्रसार करण्यांत धन्यता मानीत असे, हें वर आलेंच आहे. तेव्हां गणेशपुराणांतील विनायकाच्या शत्रूंच्या नांवांवरूनच देवांतक बौद्ध आणि नरांतक मोंगोलियन यांच्या संयुक्त आक्रमणापासून भारताचें परित्राण करण्याकरितां विनायकाचा अवतार झाला, ही गोष्ट उघड आहे. नरांतक मोंगोलियनांनीं विनायकाला मारण्याकरितां पाठविलेल्या असुरांत अंभासुर हा सर्वश्रेष्ठ असुर होता. 'येन राज्येऽभिषिक्तौ तौ देवांतकनरांतकौ' म्हणजे ज्यानें देवांतक आणि नरांतक यांना राज्याधिकार प्राप्त करून दिला, असें त्याचें गणेशपुराणकारांनीं वर्णन केलें आहे. हा अंभासुरहि स्वतः कनिष्कच होता, असें जनरल कनिंगहॅम यांनीं पुराणवस्तुसंरक्षकविभागाच्या १८६३-६४ च्या प्रतिवृत्तांत गेल्या शतकांतच लिहून ठेविलें आहे. पंजाबांतील अंब नांवाच्या खेड्यासंबंधीं लिहितांना ते म्हणतात: "According to the statements of the people, the place was bounded by Raja Amba about the beginning of the Christian era. This date would make Amba and his brothers contemporary with Hushka, Jushka and Kanishka with whom on other grounds I am inclined to identify them." पंजाबांत अंब, कप इत्यादि बंधूंच्या अंतःकलहाची एक लोककथा लोकप्रिय आहे. त्या कथेंतील अंब राजाच्या नगराचा उल्लेख जनरल कनिंगहॅम यांना टॉलेमीच्या भूगोलांतहि आढळल्यावरून त्यांनीं त्या नगराचा काळ खिस्ती शतकाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकांतला ठरविला असून त्या काळीं होऊन गेलेला कनिष्क







राजा हाच अंध्रराजा असावा, असाहि त्यांचा ग्रह झाला होता. पण या प्रश्नाची येथें चर्चा करण्याला सवड नाहीं, असें सांगून त्यांनीं तो विषय तसाच सोडून दिला असल्यानें त्यांच्या अमूल्य माहितीला निदान मी तरी मुकलों आहें.

विनायकाचा, किंवा त्याच्या उपासकांचा मुख्य शत्रु कनिष्क असल्याचा आणखी एक पुरावा भाद्रपद शुद्ध चतुर्थीला गणेशाच्या मूर्तीची स्थापना केल्यानंतर त्या दिवशीं चंद्रदर्शन न घेण्याची जी परंपरा अजून आपल्यांत प्रचलित आहे, तिच्यावरून उपलब्ध होतो. तिबेटी परंपरेवरून असें समजतें कीं कनिष्काचें नांव चंद्रकनिष्क असेंच होतें. महाराजकनिकलेख या काव्यांत ' हे राजचंद्रा, तूं चंद्राप्रमाणेंच वर्तन कर ' असा कवीनें कनिष्काला उपदेशहि केला आहे. पद्मपुराणांतील जालंधराख्यानांत कनिष्काला सिंधुपुत्र आणि लक्ष्मीचा भाऊ बनविण्याचें कारणहि हेंच आहे. अशा प्रकारें चंद्राचें कनिष्काशीं त्या काळीं तादात्म्य होऊन गेलें असल्यानें विनायकाच्या अथवा गुणेशाच्या उपासकांनीं आपल्या इष्टदेवतेच्या जयंतीला त्याच्या शत्रूचें स्मरण करून देणाऱ्या चंद्राचें दर्शनहि न घेण्याचा नियम केला. आणि आचार पाळणाऱ्या लोकांत तो नियम अजूनहि पाळला जातो. संकष्टी आणि विनायकी चतुर्थी या दोन व्रतांमधील भेदाचें मूळहि हेंच असलें पाहिजे. कनिष्कानें जी गणेशोपासना रूढ केली, तिच्यांत म्हणजे संकष्टीच्या व्रतांत प्रथम चंद्रदर्शन घेऊन मग गणेशाची पूजा करावयाची असते. संकष्टीचें व्रत ज्याला फलदायक होतें, त्यानें विनायकी चतुर्थी करूं नये, अशी जी सामान्य समजूत आहे, तिचें कारणहि या दोन उपासनांमधील विरोधांतच आहे.

## विनायकोपासना

पंजाबांतील कुषाणविरोधी युद्धाचें नेतृत्व मुख्यतः यौधेयत्रिगर्तादि आयुधजीवी संघांकडे असलें तरी पंजाबच्या दक्षिणेकडील प्रांतांतील विदेशी आक्रमकांना विरोध करण्यांत मुख्यतः ब्राह्मणांनींच पुढाकार घेतला होता. मौर्यांच्या अस्तानंतर परचक्रांचा प्राणपणानें प्रतिकार करणारीं शुंग-शालिवाहन-वाकाटकादि घराणीं ब्राह्मणवर्णाचींच होतीं. परचक्रांचा प्राणपणानें प्रतिकार करणाऱ्या घराण्यांवर वेळोवेळीं प्राणसंकटें ओढवत असत, हें सांगायलाच नको. अशा परिस्थितींत त्यांचीं राज्ययंत्रें मोडून पडलीं म्हणजे जनतेला कोणीच नायक उरत नसे. असल्या निर्नायकीच्या काळांत शालिवाहनादि राजांना शक्य तितकें साहाय्य करणाऱ्या ब्रह्मवृंदानें विनायकाच्या उपासनेच्या निमित्तानें जनतेची संघटना केली. गुणेशाला असुरांच्या विरुद्ध मिळालेला पहिला महत्त्वाचा विजय ' भीमाया दक्षिणतटे कृष्णाया उत्तरे तीरे ' म्हणजे भीमेच्या दक्षिणेला आणि कृष्णेच्या उत्तरेला असलेल्या प्रदेशांत मिळाला असें गणेशपुराणानें सांगितलें आहे. या उल्लेखावरून आणि अष्टविनायकांचीं मोरगांव, थेऊर, जुन्नर इत्यादि स्थानें सारीं पुण्याच्या आसपासच आहेत, यावरून महाराष्ट्रांतील गणेशोत्सवांचें आजचें केंद्र हेंच शालिवाहनकाळांतील विनायकोपासनेचें आणि शककुषाणविरोधी युद्धाचें प्रमुख केंद्र असल्याचें उघडकीस येतें. ही विनायकोपासना स्कंदोपासनेंतूनच तेव्हां विकास पावत होती, असें विनायकाच्या मयूरेश आणि मोरेश्वर या गणेशपुराणांतील नांवांवरून आणि मोरगांव-सारख्या त्याच्या क्षेत्रांवरून सिद्ध होतें. महाराष्ट्रांत शालिवाहनांच्या शककुषाणांशीं अतिशय अटीतटीच्या लढाया झाल्या आणि एके काळीं शकांनीं जुन्नरसारखीं पुणेंप्रांतांतील प्रमुख नगरें व्यापिलीं असतां गौतमीपुत्रासारख्या शालिवाहन नरेंद्रानें महाराष्ट्राचा अधःपात थांबवून नहपानाच्या खगराट कुळाचा उच्छेद केला. या पराजयानंतर जालंधर दैत्यानें घस्मर नांवाचा दूत पाठवून इंद्राकडे हरण करून नेलेल्या रत्नांची आणि जिंकलेल्या प्रदेशाची मागणी केली. याचा ऐतिहासिक अर्थ असा कीं कुषाण सम्राटांनीं चष्टनाचा पिता घस्मोटिक याला शालिवाहनांविरुद्ध धाडून त्यांनीं जिंकलेले प्रांत परत मिळविण्याचा प्रयत्न केला. जालंधराच्या आख्यानांतील घस्मर हें नांव इतकें वैशिष्टयपूर्ण आहे कीं तेवढयावरूनहि जाणत्या संशोधकांना त्या आख्यानाच्या ऐतिहासिक महत्त्वाची कल्पना यावी. पण पद्मपुराण वाचण्याचे श्रम अधिकारी इतिहासलेखक कशाला घेतील ?

पंजाबांतील कार्तिकेयोपासक यौधेयादि गणांपेक्षांहि दक्षिणेकडील विनायकोपासक हे शककुषाणांचे कट्टे शत्रू होते, असें बौद्धांच्या ' मंजुश्रीमूलकल्पां'तील एका मंत्रांत विनायकांचा अंतक या नात्यानें षण्मुखाला आवाहन केलें आहे, त्यावरून कळून येतें. ' नमः

समन्तबुद्धानाम् अप्रतिहतशासनानाम् । तद्यथा – हे, हे, महाक्रोध, षण्मुख, षट्चरण, सर्वविघ्नघातक, हूं हूं, किं चिरायसि, विनायकजीवितान्तकर, दुःस्वप्नं मे नाशय, लंघ, लंघ, समयमनुस्मर फट् फट् स्वाहा । '. याच ग्रंथांत कार्तिकेयमंत्र आणि वैनायकी सिद्धि यांच्या साधनेला विंध्य-प्रदेश विशेष उपयुक्त असल्याचाहि उल्लेख आढळतो. ' मंजुश्रीमूलकल्पां'तील ही माहिती विनायकोपासनेच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे. विंध्यपर्वताच्या परिसरांत उदयास आलेल्या नागकुलोत्पन्न राजांनीं शककुषाणविरोधी युद्धांत प्रामुख्यानें भाग घेतला असावा, असें कै. काशीप्रसाद जायस्वाल यांचें मत होतें. या मतावर डॉ. आळतेकरांनीं असा आक्षेप घेतला आहे कीं नागकुलोत्पन्न राजांचें कुषाणांशीं युद्ध झाल्याचे प्रत्यक्ष उल्लेख कोठेंच आढळत नाहींत. पण मला वाटतें कीं गणेशपुराणांतील पुढील अवतरणांत शककुषाणांनीं नागांवर केलेल्या अत्याचारांचा प्रतिध्वनि ऐकूं येतो. ' आज्ञापयामास च तं तत्रस्थं स नरांतकः । यदैव विकृतिं पश्येदुरगाणां तदैवहि ॥ दूतमुखात्सूचयस्व हनिष्यामोऽखिलानहीन् । '' म्हणजे ' नागलोकांनीं कांहीं बिघाड ( विकृति ) आरंभिला तर तो तत्काळ दूतमुखानें मला कळवा, मग लगेच मी सर्व नागांचा संहार करीन ' असें नरांतकानें तत्रस्थ अधिकाऱ्यांना सांगून ठेविलें होतें. उज्जयिनींत राज्य करणारे शक हे जालंधर नगरांत राज्य करणाऱ्या कुषाणांचे म्हणजे पद्मपुराणांतील सिंधुपुत्र जालंधराचे किंवा गणेशपुराणांतील सिंधुदैत्याचे अंकित असल्यामुळें पुराणकारांनीं नाग आणि शालिवाहन कुलांच्या शकांशीं झालेल्या युद्धांचा सिंधु अथवा सिंधुपुत्र या असुराशीं झालेल्या युद्धांतच समावेश केलेला आहे. निरनिराळ्या पुराणांतून उपलब्ध होणारा पुरावा लक्षांत घेतला म्हणजे पंजाबांतील कार्तिकेयोपासक यौधेयादि गण, विंध्याचलाच्या परिसरांतील शिवोपासक नाग आणि पुणेंप्रांतांतील विनायकोपासक महाराष्ट्रीय या तीन समाजांनींच शककुषाणविरोधी युद्धांतून प्रामुख्यानें भाग घेऊन शालिवाहनशकाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकांत भारतांत घुसलेल्या मोंगोलिन वंशाच्या आक्रमकांचा उच्छेद केला, हें ऐतिहासिक तथ्य उघडकीस येतें. याच शककुषाणांच्या वंशजांनीं औरंगजेबाच्या काळीं महाराष्ट्रावर पुनश्च आक्रमण केलें असतां कुषाणकालीन इतिहासाची कशी पुनरावृत्ति झाली, हें सर्वांना माहीत आहेच.

विनायक आणि गुणेश यांच्या उलट गणेश-गजाननाचा असुरांशीं निकटचा संबंध असल्याचें पुराणांतील कथांवरून दिसून येतें. त्रिपुरांतील शिवभक्त असुरांना ' गाणपत्य ' लाभलें म्हणजे मागाहून ते गणपतीचें उपासक बनले, असें लिंगपुराणानें सांगितलें आहे. असुरांनीं यज्ञयाग करून देवतुल्य बनूं नये, म्हणून असुरांची दिशाभूल करण्याकरितां गजाननानें अवतार घेतला, असेंहि त्या पुराणाचें म्हणणें आहे. जालंधर असुराची पत्नी वृंदा ही कामुक बुद्धीनें गजाननाकडे गेल्याचाहि उल्लेख 'प्राचीन चरित्रकोशां'त आढळतो. या आख्यानावरूनहि गजाननाचा असुरांशीं असलेला निकट संबंध उघडकीला येतो. कारण प्राचीनकाळीं पश्चिम गांधाराला वृंद म्हणत असत. या वृंद देशाची राजकन्या जी वृंदा, तिचेंच खरें नांव अनौपम्या असें होतें. ही स्वतःला गणेश म्हणून घेणाऱ्या कनिष्काची पत्नीच असल्यानें ती त्याच्याकडे कामुक बुद्धीनें जात असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं. पण पुढें कनिष्काची गणेशोपासना ही प्राचीन परंपरागत विनायकोपासनेशीं एकजीव झाल्यानंतर उदयाला आलेल्या पुराणकारांना वृंदा आणि गणेश यांच्या परस्परसंबंधांचें कोडें उलगडणें अशक्यच होतें, म्हणून त्यांनीं वृंदेचा विष्णूशीं संबंध जोडणारीं आख्यानें लिहून त्या पेंचप्रसंगांतून आपली सुटका करून घेतली. कनिष्क हाच गणेश असल्यामुळं गणेशाच्या मूर्ति चिनी तुर्कस्थानांत आणि इतर पीतवर्णी देशांतून सांपडतात, पण आमच्या विद्वानांस ही कल्पनाच नाही.









अनुक्रमणिका

प्रा. र. चिं. बडवे

# आपल्या शिक्षणांतील इंग्रजीचें स्थान

स्वातंत्र्यसंपादनानंतर आपल्या देशाला ज्या अनेक महत्त्वाच्या व गुंतागुंतीच्या समस्यांना तोंड द्यावें लागत आहे, त्यांतच शिक्षणाची पुनर्घटना व तींत इंग्रजीचें स्थान हिचा समावेश करावा लागेल. यासंबंधीं चालू असलेली चर्चा बहुतांशीं अकरणात्मक (negative) स्वरूपाची असून तींत प्रचलित शिक्षण-पद्धतींतील सत्य वा काल्पनिक दोष दाखविण्यावरच मुख्य भर दिला जात असल्याचें दिसतें. राष्ट्रपतींसारख्या देशांतील अत्युच्च पद भूषविणाऱ्या महान् विभूती-पासून तो लुंग्यासुंग्या पुढाऱ्यांपर्यंत बहुधा हाच मामला दिसून येतो. या सर्व टीकेंत विधायक स्वरूपाच्या सूचना मात्र क्वचितच बाहेर येतात. यामुळें चर्चा फार मोठ्या प्रमाणावर चालू असली तरी शिक्षणपद्धतींतील प्रत्यक्ष फरक गोगलगाईच्याच गतीनें होत असून जनतेला या बाबतींत पुरेसें मार्गदर्शन मिळूं शकत नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. आपल्याला या ठिकाणीं शिक्षणाच्या सर्वांगीण पुनर्घटनेचा विचार कर्तव्य नसून त्यांतील फक्त एकाच परंतु महत्त्वाच्या अंगाचा ऊहापोह करावयाचा आहे.

## इंग्रजीच्या दर्ज्यांत छाटाछाट

इंग्रज राज्यकर्त्यांनीं भारतांतील आपलें प्रस्थान हालविल्यापासून ( व कांहीं ठिकाणीं तत्पूर्वीपासूनहि ) इंग्रजी माध्यमाला अर्धचंद्र देण्याचा विचार निरनिराळ्या विद्यापीठांत मूळ धरूं लागला व त्यास उत्तरोत्तर मूर्तस्वरूपहि येऊं लागलें. कांहीं ठिकाणीं ही गोष्ट साधकबाधक परिणाम लक्षांत घेऊन केली जात आहे तर इतर कांहीं ठिकाणीं परिस्थिति बदलल्यानें विद्यापीठांना तसें करणें भाग पडत आहे. मुंबई राज्यांतील विद्यापीठें या दुसऱ्या सदरांत मोडतात. प्रवेश-परीक्षेचें माध्यमिक शालान्त परीक्षेंत रूपान्तर करून व ती मुंबई-विद्यापीठाकडून आपल्याकडे घेऊन, ती उत्तीर्ण होण्यासाठीं अवश्य असलेल्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानाचा दर्जा पद्धतशीर रीतीनें कमी करण्याच्या व तेंहि वैकल्पिक ठेवण्याच्या मुंबई सरकारच्या धोरणामुळें विद्यापीठांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यांचें इंग्रजीचें ज्ञान, इंग्रजी माध्यमांतून शिकविल्या जाणाऱ्या विषयांचें ज्ञान आकलन करण्यास अतिशय अपुरें पडूं लागल्यानें, १९५५ जून पासून विद्यापीठांना देशी भाषेचें माध्यम स्वीकारणें, भागच पडलें. कदाचित् हें घडवून आणण्याचाच हेतु मुंबई सरकारच्या धोरणामागें असूं शकेल. कांहीं विद्यापीठांनीं ही इष्टापत्ति मानून तें स्वीकारलें, तर कांहींना दुसरा मार्गच नसल्यानें अनिच्छेनें कां होईना पण तसें करावें लागलें. परिणाम दोन्हींचा एकच; तो म्हणजे मुंबई विद्यापीठाखेरीज इतरत्र प्रादेशिक भाषेचें माध्यम सुरू झालें. हा बदल सर्व दृष्टींनीं इष्ट झाला असेंच म्हटलें पाहिजे. कारण परकीय भाषेंतून शिक्षण देणें वा घेणें हें मानसशास्त्रीय दृष्ट्या सर्वस्वीं अनैसर्गिक होय. शिवाय अशा माध्यमानें देशी भाषांच्या प्रगतीला व विकासाला पायबंद बसतो. राष्ट्रीय स्वाभिमानाच्या दृष्टीनेंहि या बदलाचें स्वागतच करावयास हवें. तेव्हां झाला हा बदल योग्य झाला यांत संशय नाहीं.

उपर्युक्त बदल इतक्यावरच थांबता तर या विषयावर अधिक कांहीं लिहिण्याची आवश्यकता नव्हती. परंतु तसें झालें नाहीं. या बदलाचा दुसरा एक महत्त्वाचा परिणाम घडून येत आहे व तो मात्र कोणाहि देशहितचिंतकाला काळजी वाटण्याइतका अनिष्ट आहे. तो म्हणजे इंग्रजी भाषेच्या अभ्यासाची विद्यार्थ्यांकडून होत असलेली उपेक्षा हा होय. ही उपेक्षा दोन प्रकारांनीं जोपासली जात आहे. एक प्रकार म्हणजे शालान्त परीक्षेसाठीं अवश्य असलेल्या इंग्रजीच्या दर्ज्यांत छाटाछाट. दुसरा प्रकार म्हणजे, जर महाविद्यालयांतील व्याख्यानें आपल्याच भाषेंत होणार व परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरेंहि याच भाषेंत देण्याची सोय झालेली आहे तर इंग्रजीचा अभ्यास करण्याची आवश्यकताच काय, असा प्रश्न स्वतःलाच विचारून व त्याचें उत्तर स्वतःच नकारार्थी देऊन विद्यापीठीय विद्यार्थी इंग्रजीच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करूं लागले आहेत. कित्येक परीक्षांसाठीं तो अद्याप तरी एक अवश्य विषय असल्यानें मार्गदर्शिका वगैरे घोकून जेमतेम उत्तीर्ण होण्याइतकी तयारी करण्याकडेच सर्वसाधारण विद्यार्थ्यांचा वाढता कल दिसून येतो प्रादेशिक विद्यापीठांकडून-हि कळत न कळत या वृत्तीस खतपाणी घालण्यांत येतें. हीं विद्यापीठें स्थापन झाल्यापासून मुद्दाम

सांगण्यासारखे इतर काय फायदे झाले असतील ते असोत; परीक्षांच्या निकालाबाबत त्यांच्यांत अजाणतां थोडीफार स्पर्धा उत्पन्न झाली असावी असें वाटतें. यामुळें इंग्रजी भाषेसाठीं अमुक एक दर्जाची कसोटी ठामपणें लावली तर अनुत्तीर्णांचें प्रमाण धक्का बसण्याइतकें वाढेल या धास्तीनेंच बहुधा दरेक परीक्षेंत या दर्जाला कात्री लावणें ही गोष्ट आपोआप घडून येत आहे. या सर्व घडामोडींत दोष असा कोणाचाच नसला तरी चालू असलेला हा प्रचार देशास घातक ठरण्याचा संभव असल्यानें त्याकडे जनतेचें लक्ष वेधणें अवश्य होऊन बसलें आहे.

## पांचसहा वर्षांनंतर काय होणार ?

इंग्रजीच्या अपुऱ्या ज्ञानामुळें देशहितास बाध कसा येतो या प्रश्नाकडे आतां वळूं. सध्याचें युग हें ज्ञानाचें युग असून विविध शाखांतील परिपूर्ण व अद्ययावत् ज्ञानावरच देशाची सर्वांगीण उन्नति होणें अवलंबून आहे. हें ज्ञान प्रतिदिन सर्व बाजूंनीं सतत संवर्धित होत असून जें राष्ट्र या वाढत्या ज्ञानाकडे दुर्लक्ष करील त्याचा हल्लीच्या जगांत व्यवस्थित व मानानें निभाव लागणें कठीण हें निश्चित होय. तें परावलंबी व म्हणून दुबळेंच रहाणार वा होणार! अशा तऱ्हेनें देशाच्या जीवनांत अतिशय महत्त्व पावलेल्या ज्ञानोपासनेबाबत आपल्या देशाची स्थिति काय आहे? स्वदोष हुडकून काढून ते नाहींसे करण्यानेंच देशोन्नतीची इमारत भक्कम पायावर आधारली जाईल. या दृष्टीनें निर्विकार व निःपक्षपाती बुद्धीनें विचार केल्यास आपल्याला हें मान्य करावें लागेल कीं मूलभूत स्वरूपाचें असें ज्याचें सार्थ वर्णन करतां येईल अशा ज्ञानाचें संवर्धन आपल्याकडील विद्यापीठें व महाविद्यालयें यांतून फारच मर्यादित प्रमाणांत व तेंहि कांहीं विशिष्ट क्षेत्रांतच होत असून इतर सर्व क्षेत्रांत आपण मुख्यतः इंग्रजी ग्रंथांवरच अवलंबून आहोंत, व हीच परिस्थिति आणखी कांहीं वर्षें तरी चालणार. याहि बाबतींत दोष कोणास देणेंच असेल तर तो विद्यापीठें व महाविद्यालये यांना न देतां देशकालपरिस्थितीसच मुख्य द्यावा लागेल. प्राप्त परिस्थितींत उपलब्ध साधनद्वारें जें काय ज्ञानसंवर्धन करणें शक्य आहे तें या संस्था थोड्याफार प्रमाणांत करीतच आहेच. परंतु सध्यांची ज्ञानोपासना ही प्राचीन भारतीय ज्ञानोपासनेहून मूलतःच भिन्न असल्यानें पोट मारून व भरपूर व अद्ययावत् साधनांच्या अभावीं ज्ञानसंवर्धन हें पुष्कळ अंशीं अशक्य होय, असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं. हल्लीचें ज्ञानार्जन मूलभूत स्वरूपाचें व्हावयाचें असेल तर तें अतोनात द्रव्य, प्रचंड साधनसामग्री व संशोधक-प्राध्यापकांचें स्थैर्य व उच्च दर्जा (बौद्धिक) यांखेरीज होणें नाहीं. आपल्या विद्यापीठांची व महाविद्यालयांची तर या बाबतींत अक्षरशः उपासमार चाललेली. अशा स्थितींत त्यांना दोष देणें म्हणजे चोर सोडून संन्याश्यास सुळीं देण्यासारखेंच होय. तात्पर्य असें कीं, ज्ञानाच्या बाबतींत आपण सध्यां इंग्रजी ग्रंथांवरच मुख्यतः अवलंबून आहोंत. म्हणूनच इंग्रजी भाषेची सद्यःस्थितींत उपेक्षा म्हणजे ज्ञानाचे दरवाजे बंद करून देशाची प्रगति खुंटविण्याचें श्रेय पदरीं घेणेंच होय. जातां जातां आणखीहि एक गोष्ट लक्षांत घेणें मनोरंजक ठरेल. ती म्हणजे आपलीं विद्यापीठ-महाविद्यालयें जें ज्ञानार्जन करीत आहेत तेंहि अद्याप तरी इंग्रजींतूनच चालू आहे.

देशी भाषा मोठ्या प्रमाणांत बाळसें धरीत असतांना वरील प्रकारचे विचार पुष्कळांना केवळ औपचारिक व मुख्यतः तात्त्विक स्वरूपाचे अव्यवहार्य वाटतील. व्यवहारांत फारशा अडचणी येणार नाहींत असेंहि कित्येकजण प्रतिपादतील. या लोकांसाठीं हें मुद्दाम सांगावेंसें वाटतें कीं वर उल्लेखिलेली भीति व्यवहाराच्या दृष्टीनेंच व्यक्त करण्यांत आलेली असून तिची सत्यता अगदीं चारपांच वर्षांतच व तीहि प्रथमतः महाविद्यालयीन शिक्षणांतच दिसून येऊं लागेल. आजचे महाविद्यालयीन प्राध्यापक इंग्रजी चांगलें जाणीत असल्यानें आपापल्या विषयांवरील ग्रंथ सतत वाचून त्याचें ज्ञान अद्ययावत् ठेवूं शकतात. त्यामुळें त्यांनीं स्वतः ज्ञानसंवर्धनास हातभार लावला नाहीं तरी ते मागेहि पडणार नाहींत अशी सोय उपलब्ध आहे. परंतु पांचसहा वर्षांनंतर काय होईल? आजचे प्रथम वर्षांतील विद्यार्थी इंग्रजीच्या कनिष्ठ दर्जामुळें, महाविद्यालयांत शिकविल्या जाणाऱ्या विषयांवरील इंग्रजी ग्रंथ वाचूं शकत नाहींत व इच्छीतहि नाहीं. एखाद्यानें यदाकदाचित् वाचण्याचा हिय्या केलाच तरी त्याला ते समजूं शकत नाहींत. त्यामुळें त्यांचें ज्ञान स्वभाषेंतील तद्विषयक व केवळ त्यांच्यासाठींच लिहिलेल्या अगदीं थोड्या व कांहीं बाबतींत तर केवळ एकदोन ग्रंथापुरतेंच मर्यादित रहाणार हें उघड आहे. आवश्यक इंग्रजींत उत्तीर्ण







होण्यास अगदीं अपरिहार्य म्हणून त्यांचें काय इंग्रजी वाचन होत असेल तेवढेंच. इंग्रजी मासिकें व वृत्तपत्रें वाचणाऱ्यांची संख्याहि घटत आहे. अगदीं हीच परिस्थिति ते शेवटच्या परीक्षेपर्यंत (Master's degree) जाई तों चालणार यांत शंकाच नको. म्हणजेच आपापल्या विषयांवरील इंग्रजी ग्रंथांतील ज्ञान आकलन करण्याची कुवत बहुतांशीं नसलेले विद्यार्थी या उच्च परीक्षेसाठीं १९६१ नंतर बसूं लागतील व तींत ते प्रथम अगर द्वितीय श्रेणींत उत्तीर्ण झाले कीं ते प्राध्यापकीसाठीं पात्र होतील. यावरून हें स्पष्ट होईल कीं १९६१ नंतर, इंग्रजी ग्रंथांतील ज्ञानास पारखे असलेल्या प्राध्यापकांची संख्या महाविद्यालयांत वाढत्या प्रमाणांत दिसून येऊं लागेल व ते पुढील पिढीस शिक्षणदान करूं लागतील. आज इंग्रजींतील ज्ञानाचा दरवाजा सताड उघडा असतांनाहि जर आपण शैक्षणिक ज्ञानाचा दर्जा घास्ती घेण्याइतका खालावत असल्याची तक्रार सर्वत्र ऐकत आहोंत तर पांचसहा वर्षांनंतर हा दरवाजा बंद होऊं लागल्यावर कोणती परिस्थिति प्राप्त होईल हें प्रत्येकानें आपापल्या कल्पनेनेंच जाणावें. अक्षरशः हीच स्थिति, प्रगतीसाठीं व कार्यक्षमतेसाठीं अद्ययावत् व सर्वांगीण ज्ञानावर अवलंबून असणाऱ्या सर्वच क्षेत्रांत उत्पन्न होईल व परिणामीं देश पुच्छप्रगतीचा मार्ग चोखाळूं लागेल. इंग्रजी भाषेकडे दुर्लक्ष केल्यास सद्यःस्थितींत देशाचें नुकसान कसें होईल हें या विवेचनावरून सर्वांच्या लक्षांत येईल.

## ज्ञानोपासनेची भाषा

किंत्येक जण असें विचारतांना आढळतात कीं दरेक विषयावरील चारदोन पुस्तकांचें वाचन तद्विषयक ज्ञान मिळविण्यास अपुरें आहे असें कां मानावें? स्वभाषेंतील तीं पुस्तकें परिपूर्ण स्वरूपाचीं असावींत म्हणजे झालें. या आक्षेपकांना ज्ञानाचें सत्य स्वरूप नीटसें उमगलें नसावें असें म्हणणेंच योग्य. आज इंग्रजींत दरेक विषयावर शेंकडों किंबहुना हजारों ग्रंथ असून त्यांत प्रत्यहीं कितीतरी ग्रंथांची नवी भर पडत आहे. चारदोन ग्रंथांत एकाद्या विषयाचें ज्ञान समावूं शकतें असें म्हणणें म्हणजे हे शेंकडों-हजारों ग्रंथ बहुतांशीं एकमेकांच्या आवृत्त्याच आहेत असें सुचविणें होय. परंतु हा निवळ भ्रम आहे. विषयाचें जितकें महत्त्व तितकेंच तो ज्या दृष्टिकोनांतून लिहिला आहे त्यासहि महत्त्व आहे व स्वतंत्र प्रज्ञेचा प्रत्येक लेखक आपापल्या दृष्टिकोनांतून त्या त्या विषयाचें विवेचन करीत असल्यानें दरेक विषयावर शेकडों निरनिराळे ग्रंथ तयार होतात व ज्याला एखाद्या विषयावर प्रभुत्व मिळवावयाचें असेल त्याला हे सर्व नसले तरी त्यांतील कित्येक ग्रंथ तरी पहाणें अवश्य असेल. तसें तो न करील तर त्याचें ज्ञान एकांगी अतएव अपुरें राहील. यामुळेंच आज स्वभाषेबरोबरच दुसऱ्या देशांतील प्रगल्भ भाषांच्या अभ्यासाकडे सर्वच देशांत विशेष लक्ष पुरविण्यांत येतें. मग आपण याला अपवाद होऊन कसें चालेल? म्हणूनच स्वभाषेचें माध्यम झाल्यावरहि इंग्रजीची हेळसांड करणें देशहिताच्या दृष्टीनें घातुक आहे असें आम्हीं म्हणतों.

चांगली जाणती मंडळी परिणामीं घातुक ठरणाऱ्या अशा वृत्तीस उत्तेजन देण्यास प्रत्यक्षाप्रत्यक्ष कारणीभूत कशी होतात याचा विचार करूं लागल्यास मुख्यतः दोन कारणें नजरेसमोर येतात. एक म्हणजे स्वतंत्र भारतांत इंग्रजी भाषा शिकविण्यामागील हेतु काय यासंबंधींची अस्पष्ट, अनिश्चित व क्वचित् विकृत कल्पना व दुसरें म्हणजे राष्ट्रीयत्वाच्या खऱ्या अर्थासंबंधीं दिसावयास अतिशय सोवळी परंतु वस्तुतः चुकीची भावना. इंग्रजी शिकविण्यामागें परकीय राज्यकर्त्यांचा हेतु कांहींहि असो, स्वतंत्र हिंदुस्थानांत तरी ती भाषा मुख्यतः व मूलतः ज्ञानोपासनेसाठींच फक्त शिकविली जावयास हवी. सर्व क्षेत्रांत सतत परिवर्धित होणारें ज्ञान आत्मसात् करणें व व्यक्तविणें या कार्यासाठीं भाषा अतिशय प्रगल्भ हवी; नाहून तिला हें कार्य झेपणार नाहीं. परंतु देशी भाषा अद्याप त्या अवस्थेप्रत पोंचलेल्या नसल्यानें त्या तितका पल्ला गांठीपर्यंत आपल्याला कोणत्या तरी समृद्ध परकीय भाषेचा आश्रय करणें अनिवार्य आहे ही भाषा इंग्रजीच कां असावी याचें कारण इतकेंच कीं ती सध्यां आपल्याजवळ आहेच. हातचें सोडून पळत्याच्या मागें लागण्यांत व व्यर्थ शक्तिक्षय करण्यांत कांहींच मतलब नसल्यानें हीच भाषा आपल्याला राबवून घेणें सोयीचें होय. इंग्रजी शिकविण्यामागील हा हेतु स्पष्ट झाला म्हणजे तिच्याविषयीचे गतेतिहासोत्पन्न पूर्वग्रह वितळून जातील व देशाचें भवि-










तव्य घडविण्यांतील तिचें स्थान स्पष्टपणें मनांत ठसेल. सध्यां शिक्षणसूत्रें हातीं असणाऱ्या मंडळींकडून इंग्रजी शिक्षणाची सोय होत आहे, त्याच्या बुडाशीं प्राधान्येंकरून इतकाच हेतु दिसतो कीं परंपरा एकदम तोडणें इष्ट नाहीं, लोकमत त्याला विरुद्ध जाईल व त्याच्या कार्यवाहींत व्यावहारिक अडचणी उत्पन्न होतील, हें सर्व टाळणें. असें असेल तर ती मोठ्या खेदाची गोष्ट होय असें स्पष्ट म्हटलें पाहिजे. प्रत्यक्ष शिक्षणक्षेत्रांत काम करणाऱ्या बऱ्याच मंडळींनाहि या मूळ हेतूची कल्पना असावी तितकी आलेली असतेच असें म्हणवत नाहीं. निदान ते त्याकडे दुर्लक्ष करतात एवढें खरें. म्हणूनच ते केवळ धोपट मार्गानें नेमून दिलेलें काम करतांना दिसतात. देशहिताच्या दृष्टीनें ही परिस्थिति पालटावयास हवी. सरकार व शिक्षणदान करणारी मंडळी यांनीं इंग्रजी भाषा शिकविण्यामागील हेतु नीट लक्षांत घेऊन यापुढें तरी पावलें टाकावयास सुरवात करावी. असें झालें म्हणजे इंग्रजीवर प्रभुत्व असणें अवश्य आहे, तिच्या निव्वळ थोड्याफार अभ्यासाचा कांहीं उपयोग नाहीं हें त्यांस उमगेल.

## राष्ट्रीय स्वाभिमानाचा विकृत उपयोग

राष्ट्रीयत्व व राष्ट्रीय स्वाभिमान या भावनांचाहि असाच सद्धेतूनेंच पण विकृत उपयोग करण्यांत येत आहे. या लोकांचें म्हणणें असें दिसतें कीं "ज्ञानासाठीं कां होईना परंतु परकीय भाषेचा आश्रय करणें ही बाब राष्ट्रीय नामुष्कीची असून स्वतंत्र झालेल्या देशानें ती चालू ठेवणें म्हणजे देशाभिमानाला कलंक लावणेंच होय. बेहेत्तर आहे प्रगतीस वेळ लागला तरी किंवा ती खुंटली तरी, पण हें परकीय भाषेचें जोखड ताबडतोब झुगारून देऊन स्वत्वाची कांस धरणेंच इष्ट. असें न केल्यास राष्ट्रांतील नव्या पिढीस भाषिक गुलामगिरींत ढकलण्याचें पाप आपल्या बोकांडीं बसेल." या व अशा स्वरूपाच्या विचारांतील भावनात्मक तळमळीबद्दल प्रथमतःच संपूर्णादर दर्शवून नंतर लगेच विनयानें पण ठामपणें सांगावयास हवें कीं 'सबूर'! राष्ट्रीयत्वासंबंधींची ही कल्पना विकृत आहे. स्वत्वावर भर देणें हें अगदीं योग्य; परंतु तेथेंच राष्ट्रीयत्व संपत नाहीं. राष्ट्राची सर्वांगीण उन्नति शक्य तितक्या त्वरित घडवून आणणें यांत खरें राष्ट्रीयत्व सामावलेलें आहे. केवळ स्वभाषेच्या आधारें हें साधलें तर अगदीं कोऱ्या दुधांत साखरच. परंतु तें जर शक्य नसेल तर योग्य अशा परकीय भाषांचें साहाय्य घेऊनहि उन्नति ही घडवून आणलीच पाहिजे. स्वभाषेच्या अभिमानास्तव उन्नति थांबविण्याची कल्पना म्हणजे एका अर्थानें राष्ट्रीय व भाषिक कर्तव्यापासून च्युत होणेंच होय. हें राष्ट्रीयत्व खरें नसून निव्वळ वेगडीच होय. राष्ट्राचें बहुविध कल्याण घडवून आणील तेंच राष्ट्रीयत्व. अप्रगत अशा देशभाषांच्या नांवाखालीं परकीय भाषा बहिष्कृत करण्याऐवजी त्या भाषेचें शक्य तें सर्व साहाय्य घेऊन देशी भाषांची अद्ययावत् प्रगति अल्पकाळांत घडवून आणण्याचें कंकण बांधण्यानेंच स्वभाषेची व स्वराष्ट्राची खरीखुरी सेवा घडणार आहे हें कोणीहि विसरतां कामा नये. दुसरें असें कीं निव्वळ भाषेवरच एवढा कटाक्ष कां ? एकदां परकीय तें त्याज्य ही भूमिका पत्करण्याचें ठरलें तर ती सुसंगतपणें सर्वच बाबतींत कां लावीत नाहीं ? कारण उघडच आहे. तें म्हणजे परकीय संस्कृति देशाच्या कानाकोपऱ्यापर्यंत सर्वत्र पसरलेली असल्यानें अशी भूमिका पत्करणें हें सर्वथैव अव्यवहार्य आहे हें ही मंडळी पुरतेपणीं जाणतात. दळणवळणांच्या साधनांच्या प्रगतीमुळें आपला देशच नव्हे तर सर्व जगच एक होण्याच्या मार्गावर असतां स्वभाषेसंबंधींची आत्यंतिक भूमिका पत्करणाऱ्यांना काय म्हणावें हेंच समजत नाहीं. भाषा प्रगत असलेले देशहि इतर भाषांच्या अभ्यासाचें महत्त्व जाणून आपापल्या नागरिकांना त्या शिकविण्याची सोय अधिकाधिक प्रमाणांत करीत असतां, आपण ही भूमिका कशी पत्करूं शकतों ? भाषेचा अभिमान काय फक्त आम्हांलाच आहे ? तात्पर्य इतकेंच कीं कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी भाषेच्या बाबतींत आत्यंतिक विचारांच्या आहारीं जाण्यांत देशाचें व स्वभाषेचें तर अहित आहेच शिवाय तें कालप्रवाहाच्याहि विरुद्ध आहे. म्हणून इंग्रजी भाषेची जी हेळसांड सध्यां चालू आहे ती अगदीं त्वरित बंद झाली पाहिजे.

ज्यांचे व्यवसाय ज्ञानाधिष्ठित नसतील त्यांना मात्र इंग्रजी शिक्षणाची सक्ति करण्याची आवश्यकता दिसत नाहीं. कारण स्वतंत्र भारतांत इंग्रजीच्या किरकोळ ज्ञानानें कांहीं फायदा होईल असें वाटत नाहीं. इंग्रजीऐवजीं अशा लोकांसाठीं, हिंदी सक्तीचें केल्यास सर्व देश एकभाषेच्या समानबंधनानें बांधण्याचें कार्य सहज पार पडूं शकेल.








श्री. चा. अ. दाभोलकर

# शेतीचा आकार व उत्पादनक्षमता

" भूदानयज्ञामुळें भारतीय शेतीचे आधींच लहान असलेले तुकडे आणखी लहान होतील व त्या योगें शेतीच्या सध्यांच कमी असलेल्या एकरीं उत्पादनांत आणखीच घट येईल ! " हा आक्षेप अर्थशास्त्रज्ञांकडून भूदानयज्ञाबाबत वारंवार घेतला गेलेला आढळतो. परंतु " शेतीचा आकार जितका लहान तितकें तिच्यापासून मिळणारें एकरी उत्पादन कमी " या सिद्धांताचें शास्त्रीय दृष्ट्या समर्थन करूं शकेल अशी तुलनात्मक आंकडेवारी मुद्दाम प्रयत्न करूनहि अजूनपर्यंत निदान माझ्या तरी अवलोकनांत आलेली नाहीं. महाराष्ट्रांतील शेतीबाबतचा माझा वैयक्तिक अनुभव तर बराचसा या सिद्धांताच्या उलटच आहे. उलट, " भारतीय शेतींतून अमेरिकेंतील शेतीपेक्षां कमी उत्पन्न निघतें कारण भारतीय शेतीचा आकार अमेरिकन शेतीपेक्षां लहान आहे. " अगर " क्रांतिपूर्व रशियांत शेतीचा आकार लहान होता व शेतीचें उत्पन्न पण कमी होतें. परंतु क्रांतीनंतर कम्युनिस्टांनीं सामुदायिक शेती सुरूं करून शेतीचें उत्पादन वाढविलें. " अशासारख्या विसंगत तुलना करून शेतीचा आकार मोठा झाला कीं उत्पादन कां वाढतें याची कारण-मीमांसा करणारीं पानेच्या पानें माझ्या वाचनांत आलीं आहेत !

परंतु ज्याला शास्त्रीय पद्धतीनें केलेली तुलना म्हणतां येईल अशा प्रकारची खालील आंकडेवारी मला उपलब्ध झालेली आहे [१]. ती आंकडेवारी व तिच्यावरून मला सुचलेले विचार पुढें देत आहे.

त्या आंकड्यांवरून असें दिसतें कीं ३५० एकर एकत्र कसण्यापेक्षां त्याचे १२ एकराचे तुकडे पाडून ते वेगवेगळे कसले असतांच एकरीं उत्पादन जास्त मिळतें. शेतीच्या धंद्यांत 'संख्ये'पेक्षां गुणालाच जास्त महत्त्व असल्यानें व स्वतःच्या मालकीच्या शेतांत केल्या जाणाऱ्या कामाचा दर्जा नेहमींच उजवा ठरणें स्वाभाविकच असतें म्हणून मला तरी वरील प्रयोगाचे निष्कर्षच जास्त स्वाभाविक वाटतात.

जगाच्या पाठीवरील शेतकी उत्पादनांत आघाडी-वरील देशांमध्यें डेन्मार्क या छोट्या युरोपीय देशाची गणना होते. डेन-किसानाच्या राहणीच्या मानाचा जगाच्या पाठीवरील बहुसंख्य किसानांनीं हेवा करावा

---

१ 'शेतकी व शेतकरी' मासिकाच्या जानेवारी १९५२ च्या अंकांत Indian Farming च्या डिसेंबर १९५० च्या अंकावरून खालील माहिती घेतली आहे.

" शेतवहिवाटीच्या पद्धतीचा शेतीच्या उत्पन्नावर होणारा परिणाम पहाण्यासाठीं 'Indian Council of Agricultural Research' या संस्थेच्या खर्चानें बडोदें संस्थानांत १९४६ पासून केलेल्या प्रयोगांची पहिल्या तीन वर्षांची सरासरी आंकडेवारी पुढीलप्रमाणें आहे :

| गांवाचें नांव | शेतवहिवाटीचा प्रकार | ३ वर्षांतील सरासरी नक्त नफा दर एकरी |
|---|---|---|
| ( १ ) खोदिया | मालकी हक्क | ९८–३–० |
| ( २ ) पोचंबी | कायमकूळ | ६४–८–० |
| ( ३ ) पूर्व – पाला | सामुदायिक | ५६–३–० |
| ( ४ ) पश्चिम – पाला | सहकारी | २९–८–० |

" वरील चारीहि गटांतील क्षेत्र प्रत्येकी ३५३ अेकर असून, प्रत्येक गटांत ३० शेतकरी कुटुंबेंच शेती कसत होतीं. फक्त कोरडवाहू पिकेंच घेतलीं होतीं; व वरीलपैकीं प्रत्येक गटाला शक्य ती सर्व तांत्रिक मदत देण्यांत आली होती. "








अशी परिस्थिति आहे. डेन्मार्कमधील शेतीची ही सर्व प्रगति प्रामुख्येंकरून गेल्या शतकाच्या शेवटापासूनची आहे. याच काळांत भांडवलदारी, सहकारी, सामुदायिक वगैरे मार्गांनीं शेतीचें एकत्रीकरण करून मोठ्या आकाराची शेती निर्माण करण्याचे प्रयत्न अमेरिका, इस्त्राइल, रशिया वगैरे देशांत यशस्वीपणें केले गेले. परंतु डेन्मार्कमधील शेती ही संपूर्णतया खाजगी मिळकत असून, प्रत्येक शेत वेगवेगळें कसलें जातें. इतकेंच नव्हे तर आज सरासरी डेन शेताचा आकार ३७·६ एकर आहे व एकूण शेतांपैकीं फक्त शेंकडा ३ चा आकार १५० एकरांपेक्षा मोठा असून शेंकडा ५० शेतांचा आकार २५ एकरांपेक्षांहि लहान आहे. मोठ्या शेतांचे, एक कुटुंब कसूं शकेल येवढ्या आकाराचे लहान तुकडे पाडून ते लायक इसमांना देण्यासंबंधाचे कायदे गेल्या शतकाच्या शेवटापासून डेन-लोकसभेनें केलेले आहेत व प्रत्यक्षांत सरकारी रीत्या आजतागायत अशीं २५,००० नवीन शेतें निर्माण केलीं गेलीं आहेत.

या बाबत कोपनहेगनमधील " Institute of Farm Management & Agricultural Ec nomics " या संस्थेचे डायरेक्टर Johs Ridder यांचेबरोबर चर्चा करण्याचा मला योग आला. शिवाय वरील संस्थेनें अिंग्रजी भाषेंत प्रसिद्ध केलेल्या " Thirty Years of Farm Accounts & Agricultural Economics in Denmark – 1917 to 1947 " हें पुस्तकहि मीं पाहिलें. हें पुस्तक डेन-किसानांच्या ३० वर्षांच्या हिशेबांच्या आधारें तयार केलें आहे. त्यांतील नमुना म्हणून " Survey of Danish Agriculture " National Danish F. A. O. Report मध्यें पृष्ठ १४१ वर दिलेलें कोष्टक खालीं दिलें आहे. त्या कोष्टकांतील आंकडेवारीवरून आपण पुढील निष्कर्ष काढूं शकतों.

शेतीचा आकार जितका लहान तितकें तिच्या दर हेक्टरपासून मिळणारें एकूण उत्पन्न जास्त. मात्र शेतींत गुंतलेल्या भांडवलावरील व्याजाच्या दृष्टीनें विचार केला, तर १० हेक्टरपेक्षां लहान शेतींतून व्याजाचा दर थोडाफार कमी मिळतो. परंतु याबाबत एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं शेतकऱ्याच्या राहत्या घराची किंमतहि शेतींत गुंतलेल्या भांडवलांतच धरलेली आहे. आणि शेतीच्या भांडवलांपैकीं राहतें घर हा भाग उत्पादक म्हणतां येत नाही. साधारणपणें रहात्या घराचा आकार शेतीच्या आकारापेक्षां कुटुंबाच्या आकारावरून ठरतो व त्यामुळें मोठ्या व लहान आकाराच्या शेतींत तो खर्च सारखाच पडतो. नाहींतर उत्पादनक्षमतेच्या दृष्टीनें विचार केल्यास ६·७ हेक्टर म्हणजे सुमारें १५ एकरांचें शेतच जास्त उत्पादनक्षम म्हणावें लागतें.

तीस वर्षांच्या सरासरीवरूनसुद्धां फारसे वेगळे निष्कर्ष निघत नाहींत. त्या सरासरी बाबतच्या कोष्टकाप्रमाणें दहा हेक्टरपेक्षां लहान आकारांच्या शेतींचें नक्त उत्पादन एका हेक्टरमागें ८२४ क्रोनर असून तें उतरत्या क्रमानें कमी होऊन १०० हेक्टरपेक्षां मोठ्या आकाराचे शेतींत फक्त ४८६ क्रोना आहे.

मात्र व्याजाकरतांच शेती करावयाची असेल तर शेतीचा आकार जास्तींत जास्त मोठा करणेंच फायद्याचें ठरेल. परंतु शेतीच्या धंद्याच्या उत्पादनक्षमतेच्या दृष्टीनें विचार केल्यास शेतीचा आकार लहान करणेंच किफायतशीर ठरतें. डेन्मार्कचें राष्ट्रीय जीवन शेतीच्या एकूण उत्पादनावर अवलंबून असल्यानें भांडवलावरील व्याजांत येणारी ही तूट लहान शेतकऱ्यांना कमी अगर बिनव्याजानें कर्जाऊ रकमा देऊन सोसणें हेंच तेथील सरकारला जास्त सोयीचें वाटतें. व त्यामुळें सरकारकडून अशा सवलतीच्या दरानें लहान शेतकऱ्यांना कर्ज दिलें जातें. शिवाय

२ डेन्मार्कमधील किसानांचें दर हेक्टर मागें मिळणारें एकूण व नक्त उत्पादन (१९३८-१९३९)

| गटाची मर्यादा (हेक्टर) | गटाचें सरासरी क्षेत्र (हेक्टर) | एकूण उत्पन्न (क्रोना) | शेतीचा खर्च (क्रोना) | निव्वळ उत्पन्न (क्रोना) | भांडवलावर सुटलेलें व्याज |
|---|---|---|---|---|---|
| –१० | ६·७ | १०११ | ८८० | १३१ | ३·४ |
| १०–२० | १५·० | ७२६ | ६२३ | १०३ | ३·७ |
| २०–३० | २४·९ | ६३१ | ५४६ | ९१ | ३·६ |
| ३०-५० | ३८·० | ५७२ | ४८९ | ८३ | ३·६ |
| ५०–१०० | ६३·९ | ५०१ | ४३३ | ६८ | ३·१ |
| १०० व जास्ती | १८७·२ | ४७४ | ४११ | ६३ | ३·२ |

टीपः– एक हेक्टर = २·४७ एकर. एक क्रोना = १० ते ११ आणे.








लहान शेतकऱ्यामुळें समाजाला येणारें स्थैर्य लक्षांत घेतां शांतता-रक्षण, बेकारी निवारण वगैरेचा खर्च त्या मानानें कमी होऊं शकतो. मला मिळालेल्या माहितीप्रमाणें दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीला डेन्मार्कमध्यें लष्कर अजिबात नव्हतें. तसेंच तेजीच्या काळांत मोठ्या आकाराच्या शेतींतून जास्त टक्के व्याज मिळणें शक्य असलें तरीदेखील मंदीच्या काळांत लहान शेतीच जास्त तग धरूं शकेल. कारण १९३० सालच्या मंदीच्या सपाट्यांत दहा हेक्टरपेक्षां लहान आकाराचे शेतींत शेकडा ०.२ टक्के नफा झाला असून तेवढाच नफा फक्त २० ते ३० हेक्टरचे गटांतून झाला आहे. बाकी सर्व गटांत ०.१ टक्के तोटा झाला असून १०० हेक्टरपेक्षां मोठ्या गटांत तर ०.३ तोटा झाला आहे.

डेन-शेतींतील मुख्य उत्पादन हें प्रामुख्येंकरून जनावरांपासून मिळतें. व शेतीचा आकार जितका लहान तितकें दर हेक्टरमागें जनावरांचें जास्त अन्न पिकवलें जातें. म्हणजे दर हेक्टरमागें १० हेक्टरपेक्षां कमी आकाराचे गटांत ४१४६ फीडयुनिट जनावरांचा खुराक पिकवला जातो. ( १ फीडयुनिट = १ किलोग्रॅम बार्ली इतकाच जनावरांच्या खुराकाच्या दृष्टीनें उपयुक्त असलेला इतर प्रकारचा जनावरांचा चारा पेंड वगैरे खुराक. प्रत्येक पदार्थाचें फीडयुनिट शास्त्रीय प्रयोगानें ठरवलें जातें. ) उतरत्या क्रमानें तो कमी होऊन १०० हेक्टरपेक्षां मोठ्या शेतांच्या गटांत फक्त ३१२५ फीड युनिट पिकतात. त्यामुळें दर १०० हेक्टर जमिनीमागें लहान आकाराच्या शेतींतच जास्त जनावरें पाळलीं जातात; येवढेंच नव्हें तर लहान शेतीवरील प्रत्येक दुभतें जनावर जास्त दूध देतें. दहा हेक्टरपेक्षां लहान आकाराच्या शेतांतील प्रत्येक दुभतें जनावर वर्षाला सरासरी ३९०२ किलोग्रॅम ( १ किलोग्रॅम = २.२ इंग्लिश पौंड ) दूध देतें, तर उतरत्या क्रमानें कमी होत होत १०० हेक्टरपेक्षां मोठ्या आकारांच्या शेतींतील प्रत्येक जनावर वर्षाला सरासरी ३५८४ किलोग्रॅम दूध देतें; त्यामुळें लहान आकाराच्या शेतीवरच दुधाचें एकूण सरासरी उत्पादन जास्त होतें.

डेन-शेतीचें दुसरें महत्त्वाचें उत्पन्न डुकराचें मांस ! दहा हेक्टरपेक्षां लहान आकाराच्या शेतींत डुकरांची सरासरी संख्या हेक्टरमागें २.११ असून उतरत्या क्रमानें तिच्यांत घट होऊन १०० हेक्टरपेक्षां मोठ्या आकाराच्या शेतींत डुकरांची संख्या दर हेक्टरला फक्त ०.६१७ च असते. एकूण एकरीं जास्त बेकन लहान आकाराच्या शेतींतच पिकवलें जातें.

अर्थात् डेन्मार्कमध्यें शेतीचें उत्पादन हें प्रामुख्यानें निर्यातीसाठीं आहे. त्यामुळें लहान शेतींत केवळ जास्त उत्पादन होऊन जर तें सर्व उत्पादकानेंच खाल्लें तर त्याचा एकूण राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या दृष्टीनें डेन्मार्कला फारसा उपयोग होणें शक्य नाहीं. परंतु १९४१-४२ च्या आंकडेवारीप्रमाणें दहा हेक्टरपेक्षां लहान आकाराच्या गटांतून हेक्टर मागें १०९२ क्रोना किंमतीचा माल विक्रीला पाठवला होता, तर उतरत्या क्रमानें कमी होऊन १०० हेक्टरपेक्षां मोठ्या गटांतील शेतींतून हेक्टरमागें फक्त ७१३ क्रोना किंमतीचा माल विक्रीला पाठवला होता.

याबाबत असाहि एक मुद्दा उपस्थित होऊं शकतो कीं वरील सरासरी १९१७ ते १९४७ पर्यंतच्या काळांतील आहे. परंतु दिवसेंदिवस शेतीचें जास्त जास्त यांत्रिकीकरण होत आहे. त्यामुळें, आजच्या घडीला लहान शेती व मोठी शेती यांत जास्त उत्पादक काय ही शंका उत्पन्न होणें साहजिक आहे. त्या दृष्टीनें डेन-भार्षेत प्रसिद्ध झालेल्या अगदी अलिकडील-म्हणजे १९५२-५३ च्या रिपोर्टमधील खालीं दिलेल्या कोष्टकावरून[3]

| ३ शेतीच्या आकाराप्रमाणें पाडलेल्या गटाची मर्यादा | भाडोत्री मजुरांची रोजगारी (क्रोना) | कुटुंबांतील लोकांची मजुरी व व्यवस्थापकीय कामाचा मुशाहिरा (क्रोना) | कर्जमुक्त शेतीचें नक्त उत्पन्न (क्रोना) | कर (क्रोना) | एकूण (क्रोना) |
|---|---|---|---|---|---|
| – १० | १५० | १०७९ | ३९६ | ८३ | १७०८ |
| १०– २० | ३४० | ५६६ | ३७० | ७९ | १३५५ |
| २०– ३० | ४१६ | ३७४ | ३३६ | ९३ | १२१९ |
| ३०– ५० | ४२५ | २७३ | ३३३ | ८१ | ११४१ |
| ५०–१०० | ४७७ | १८७ | ३४६ | ८१ | १०९१ |
| –१०० पेक्षां जास्त | ५४६ | ७८ | ३२७ | ८६ | १०३७ |








नजर फिरवली असतां असल्या शंकेंत तथ्य नसल्याचें लक्षांत येईल.

याबर असाहि एक मुद्दा उपस्थित होऊं शकतो कीं डेन्मार्कमधील लहान शेतीचा सरासरी आकार म्हटला तरी तो ६.७ हेक्टर, म्हणजे १५–१६ एकर होतो. आमच्या भारतीय शेतीचे तर अर्धापाऊण एकरायेवढेहि तुकडे पडले आहेत! – पण तसें पाहिलें तर डेन्मार्कमधील जमिनीचेहि इतके लहान तुकडे नाहींतच असें नाहीं. पण कोरडवाहू शेतीच्या येवढ्या लहान आकाराला डेन्मार्कमध्यें काय अगर भारतांत काय परडें हाच शब्द लावणें जास्त योग्य ठरेल; आणि म्हणूनच त्याबाबत येथें विचारहि करण्याचें कारण नाहीं. उलट बागायतीखालीं मोडणाऱ्या अशा क्षेत्राला इंग्रजींत ' Horticulture ' म्हणतात. आणि अशा क्षेत्रांत डेन्मार्कमध्यें काय अगर भारतांत काय पैशाचीं पिकें घेतलीं जातात! " एक कुटुंब स्वतःच्या श्रमानें कसूं शकेल येवढी जमीन " ही व्याख्या अशा-वेळीं अर्धापाऊण एकरालाच लागू पडते! पन्नास एकर माळरानापेक्षां अर्धापाऊण एकर पानमळा जास्त उत्पादक व जास्त मनुष्यबळ जिरवणारा असतो ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. तसेंच पशुपालना-करतांच वापरल्या जाणाऱ्या शेतीपेक्षां इतर पिकांखालील जमिनीचें क्षेत्र हें नेहमींच कमी असतें ही गोष्टहि वरील तुलनेच्याबाबत लक्षांत घेतली पाहिजे. शिवाय आपल्याप्रमाणें डेन्मार्कमध्यें सामायिक गायरान नसतें तर प्रत्येक शेतकऱ्याच्या शेतींतच सुमारें तिसरा हिस्सा जमिनींत चाऱ्याकरतां गवत पेरलें जातें. ही गोष्ट लक्षांत घेतां १५ एकरांपैकीं ५ एकर गायराना-साठींच जातात! उरले १० एकर. आणि डेन्मार्कमधील जमिनींत वर्षाला फार तर एकच पीक घेतां येतें ही गोष्ट लक्षांत घेतली तर आमच्याकडील दुपिकी ५ एकर जमीनहि एका कुटुंबाला पुरेसें काम व दाम पुरवणें अशक्य नाहीं. अर्थात् एका कुटुंबाला स्वतः-च्या श्रमानें कसण्याला किती जमीन पुरेशी होईल हें प्रामुख्यानें शेतीच्या स्थानिक परिस्थितीवरच अवलंबून असतें. म्हणून जगाच्या पाठीवर हजारों मैल अंतरा-वरील दोन भिन्न देशांच्या शेतीच्या आकाराची तुलना न केलेलीच बरी! मग तो देश डेन्मार्क असो, अमेरिका असो, अगर रशिया असो, भारतापुरतेंच बोलावयाचें तर सप्टेंबर ५४ च्या ' The International Sugar Journal ' मध्यें पृष्ठ २४६ वर Indian Sugar 1953, 3 No 7. pp. 295–299 वरील के. एल. कर्नालकर यांच्या ' बिहारमधील पीकपहाणी ' या लेखांवरून बिहार-मधील शेतीचा आकार व उसाचें एकरी उत्पादन या बाबत पुढील विधान अर्थपूर्ण आहे : " लक्षांत घेण्या-जोगा एक मुद्दा म्हणजे शेतीच्या आकाराबरोबर एकरीं उत्पादनांत शेतीचा आकार चार एकर होईपर्यंतच वाढ होते व त्यापेक्षां मोठा आकार झाल्यास एकरीं उत्पादनांत घट होते! "

---

## येशिल कां तूं – !

येशिल कां तूं भर मध्यान्हीं<br>
फुंकर घालित दग्ध मनावर<br>
कीं लाजुन ही दुपार होइल –<br>
रात्र चांदणी स्वप्निल-कातर !

किंवा याबिस वसंतपाउलिं<br>
चैतन्याच्या फुलांस फुलवित<br>
हिरवट-पिवळ्या शृंगारांतुन<br>
झडलेल्या वृक्षाला हंसवित.

होउन ये तूं ग्रीष्मामधली<br>
प्रसन्न संध्या स्वार वायुवर<br>
पश्चिमेस अन् रंग भराया<br>
नजर जगाची खिळेल ज्यावर.

– परंतु येशिल स्वप्न होउनी<br>
निद्रेच्या अन् छेडित तारा<br>
दिक्कालांतुन जेव्हां असतो<br>
गहन शांतिचा खडा पहारा !.

– तु. शं. कुलकर्णी










अनुक्रमणिका

प्रा. दा. गो. ढवळे व प्रा. द. श्री. जोग

# डॉ. मेघनाद साहा

जगद्विख्यात भौतिक शास्त्रज्ञ प्रोफेसर मेघनाद साहा दि. १६ फेब्रुवारी १९५६ रोजीं एकाएकीं निधन पावले. मरणसमयीं त्याचें वय बासष्ट वर्षांचें होतें. नियोजन मंडळाच्या-बैठकींत उपस्थित राहाण्यासाठीं जात असतां त्यांना हृदयविकाराचा झटका आला व त्यांतच त्यांचा अंत झाला. देशभर पसरलेले त्यांचे असंख्य शिष्य व मित्र या अनपेक्षित घटनेमुळें हळहळले. ज्या लोकसभेचे ते सभासद होते तिचें चालू असलेलें अधिवेशन ही दुःखद वार्ता आल्याबरोबर त्या दिवसापुरतें तहकूब झालें. लोकसभेचे उपसभापति, राष्ट्राचे उपाध्यक्ष, नियोजनमंत्री श्री. गुलजारीलाल नंदा इत्यादि प्रमुख व्यक्तींनी लोकसभेच्या व राज्यसभेच्या अधिवेशनांत त्यांच्या स्मृतीस श्रद्धांजलि अर्पण केली.

## जीवनचरित्र

कै. प्राध्यापक साहा यांचा जन्म हल्लीं पाकिस्तानांत असलेल्या पूर्वबंगालच्या डाक्का जिल्ह्यांतील एका लहान गांवांत ६ ऑक्टोबर १८९३ या दिवशीं झाला. त्यांच्या वडिलांचा धंदा किरकोळ व्यापाराचा होता. मेघनाद व त्याचे बहीण-भाऊ मिळून आठ भावंडें होतीं, अशा परिस्थितींत पांचांपैकीं एका मुलाच्या शिक्षणाकडे वडिलांचें फारसें लक्ष नसल्यास आश्चर्य नाहीं. मेघनादला लहानपणींच दुकानांत पोऱ्या म्हणून काम करावें लागलें पण त्या कामांत तो अगदींच नालायक ठरला. उलट प्राथमिक शाळतच या मुलाच्या शिक्षकांना त्याच्या हुषारीची जाणीव होऊन त्यांनीं हायस्कूलचें शिक्षण तरी मुलांस द्यावें हें त्याच्या वडिलांस पटवून दिलें, तदनुरूप माध्यमिक शाळेंतून पहिल्या नंबरची शिष्यवृत्ति घेऊन मेघनादनें डाक्यांत हायस्कूलमध्यें प्रवेश मिळविला. परंतु बंगालच्या फाळणीविरुद्ध चळवळींत भाग घेतल्याचें प्रायश्चित्त म्हणून त्याला शिष्यवृत्ति व शाळाहि सोडून दुसऱ्या शाळेंत जावें लागलें. १९०९ मध्यें पूर्व बंगालच्या विद्यार्थ्यांत पहिला नंबर मिळवून ते एन्ट्रन्स-परीक्षा पास झाले. कॉलेजचें सर्व शिक्षण शिष्यवृत्त्यांच्या आधारावरच अवलंबून होतें. बी. एससीच्या वर्गांतील त्यांच्या सहाध्यायांत सत्येंद्रनाथ बोस, निखिलरंजन सेन, ज्ञानचंद्र घोष अशी विज्ञानविषयांत पुढें नामांकित झालेली मंडळी होती. शिक्षकांत जगदीशचंद्र बोस, प्रफुल्लचंद्र रे यांसारखे विद्वान् प्राध्यापक होते. येथेंच मेघनाद साहांचा राजकीय चळवळींत भाग घेणाऱ्या तरुणांशींहि संबंध आला. पुढें ते गणित विषयांत पहिल्यावर्गांत एम्. एस्सी. झाल्यावर जेव्हां अर्थखात्याच्या परीक्षेस बसण्याच्या तयारीस लागले तेव्हां क्रांतिकारकांशीं याचा संबंध आहे या कारणानें त्यांस परवानगी नाकारण्यांत आली. आम्ही ( प्रस्तुत लेखक ) अलाहाबादला असतांना डॉ. साहांनीं या गोष्टीचा एकदां उल्लेख केला होता. १९३०-३१ च्या चळवळींत विद्यापीठांत हरताळ पडला होता. फक्त कांहीं संशोधन करणारे विद्यार्थीच विद्यापीठांत जात असत, हरताळ पाडण्यासाठीं हल्लींप्रमाणेंच त्या वेळींहि थोडे विद्यार्थी आणि पुष्कळसे गांवगुंड अशांच्या टोळ्या 'बंद करा' ' घरीं जा ' असा ओरडा करीत हिंडत असत. अशी एक टोळी एकदां आमच्या खात्याकडे आली असतां डॉ. साहा संतापून बाहेर आले आणि म्हणाले " देशभक्तीचा मक्ता तुम्हीच घेतला आहे असें समजूं नका. मीहि लहानपणीं क्रान्तिकारकांमध्यें वावरलों आहें ! "

या वेळीं कलकत्ता-विद्यापीठाचे उपकुलगुरु सर आशुतोष मुकर्जी यांनीं बी. ए. बी. एस्सी नंतरचें शिक्षण विद्यापीठानें आपले हातांत घेण्याची योजना








आंखली होती, त्यासाठीं ते हुषार होतकरु तरूण शिक्षकांच्या शोधांत होते. त्यांनीं साहांची गणित-विषयांत लेक्चरर म्हणून नेमणून केली, पण साहांनीं लवकरच गणिताकडून भौतिक शाखेकडे आपली बदली करून घेतली. याच शाखेंत प्रोफेसर रामन् पलित प्रोफेसर म्हणून दाखल झाले. गणिताची पदवी घेतलेला माणूस विज्ञान-शाखेंत पडला, पण आपल्या हुषारीच्या बळावर साहांनीं याहि शाखेंत अगदी थोडक्या अवधींत आघाडीचें स्थान मिळविलें. विज्ञानाच्या इतिहासांत हा काळ अत्यंत खळबळीचा होता. आइन्स्टाइनचा सापेक्षतेचा सिद्धांत व प्लँन्कचा ऊर्जाणुवाद (Quantum Theory) सिद्धान्त, या दोन सिद्धान्तांनीं अगदींच अनपेक्षित प्रकारची विचारसरणि उभी केली होती. या दोन्ही गोष्टी काय आहेत याची स्पष्ट कल्पनाहि फार थोड्यांना होती. ज्यांना होती ते सर्वच ही विचारसरणि मान्य करण्यास तयार होते असेंहि नाहीं. जीवनशास्त्रांत ज्या प्रकारची खळबळ डार्विनच्या सिद्धांतानें उडवून दिली तशी विज्ञानांत या दोन सिद्धांतामुळें उडाली होती. भारतांत या नवीन विषयाच्या अभ्यासकांत मेघनाद साहा प्रमुख होते. त्यांनी 'स्टेट्समन' मध्यें आइन्स्टाइनच्या सिद्धांतावर एक लेख लिहून त्यांतील विचार लोकांपुढें प्रथमच मांडले. येथूनच त्यांच्या शास्त्रीय लिखाणाला व संशोधनात्मक निबंधांना सुरवात झाली. कोणाचेहि मार्गदर्शनाशिवाय संशोधन करून त्यांनीं कलकत्ता विद्यापीठाची डी. एस्. सी ची पदवी मिळविली. पुढें प्रेमचंद रॉयचंद शिष्यवृत्ति मिळवून उच्च शिक्षणासाठीं युरोपमध्यें जाण्याची त्यांची आकांक्षा सफल झाली. बंगालमधील विद्यार्थ्यांमध्यें प्रेमचंद रॉयचंद शिष्यवृत्ति मिळविणें हा देखील मोठा बहुमान समजला जातो. लंडन येथील इंपीरियल कॉलेजांत प्रो. फाउलर यांचे जवळ राहून डॉ. साहांनीं जो निबंध लिहिला तो फार श्रेष्ठ प्रतीचा होता. येथून जर्मनींत प्रसिद्ध वैज्ञानिक नर्न्स्ट (Nernst) यांच्या प्रयोगशाळेंत एक वर्षभर काम करून कलकत्ता विद्यापीठांत खैरा प्रोफेसर म्हणून ते रुजू झाले. पण येथें मनासारखें काम करण्यास संधि न मिळाल्यानें ते अलाहाबाद विद्यापीठांत प्रोफेसर म्हणून गेले. त्यावेळीं अलाहाबादच्या प्रयोगशाळेंत किंवा ग्रंथालयांत संशोधनयोग्य उपकरणें अगदींच नव्हतीं. यावेळची एक गमतीची गोष्ट अशी सांगतात कीं डॉ. साहांनीं ग्रंथालयांत नवीन पुस्तकें घेण्यासाठीं विद्यालयाकडे पैशांची मागणी केली, तेव्हां विद्यालयाच्या एका अधिकारी व्यक्तीनें त्यास सांगितलें कीं 'ग्रंथालयांत जीं पुस्तकें आहेत तीं सर्व आधीं वाचा आणि मग आणखी पुस्तकें घेण्यासाठीं पैसे मागा!' परंतु येथें येऊन तीनचार वर्षें झालीं नसतील एवढ्यांत 'फेलो ऑफ द रॉयल सोसायटी' म्हणून त्यांची निवड झाली. यावेळीं त्यांचें वय अवघें ३४ वर्षांचें होतें. आम्ही दोघेहि (लेखक) त्यावेळीं अलाहाबादला त्यांचे जवळ शिकत होतों. आपले गुरू एफ् आर्. एस. झाले याबद्दल आम्हा विद्यार्थ्यांना अतोनात हर्ष झाला. या त्यांना मिळालेल्या बहुमानाचा अपेक्षित असाच परिणाम होऊन विज्ञानशाखेस सरकार आणि विद्यापीठ यांकडून देणग्या मिळूं लागल्या. पंधरा वर्षें अलाहाबादला काढल्यानंतर ते पलित–प्रोफेसरच्या जागीं कलकत्ता विद्यापीठांत गेले. येथें त्यांनीं परमाणु-संशोधन-संस्था काढली व तिचे ते शेवटपर्यंत संचालक होते.

### शास्त्रीय कामगिरी

प्रो. साहांनीं अनेक संशोधनात्मक लेख लिहिले आहेत. अणु-परमाणूपासून विश्वापर्यंत सर्व विषयांत त्यांनीं संशोधन केलें पण ज्या संशोधनामुळें त्यांची जगभर वाहवा झाली तें त्यांनीं अगदीं अल्पवयांत केलें. या संशोधनास 'Saha's Theory of







Thermal Ionisation ' असें नांव आहे. संशोधनाची भूमिका अशी:— आकाशांत अनेक तारे आहेत, निरनिराळ्या ताऱ्यांचें उष्णतामान निरनिराळें आहे, परंतु सर्वांचेंच उष्णतामान इतकें आहे कीं सर्व स्वयंप्रकाशित आहेत, या प्रकाशाचें पृथक्करण केल्यास असें दिसून येतें कीं त्यांच्या वर्णपटांत ( Spectrum मध्यें ) पृथ्वीवर आपल्या ओळखीच्या असणाऱ्या मूलतत्त्वांचें ( elements चें ) अस्तित्व आहे पण कांहीं तारकांत एक प्रकारचा वर्णपट सांपडतो तर इतरांत दुसऱ्या प्रकारचा. आतां सृष्टींतील सर्व ताऱ्यांत मूलतत्त्वें तींच असावींत हें सयुक्तिक वाटतें. फार तर त्यांचे प्रमाणांत फरक असेल. मग हीं तत्त्वें कांहीं ताऱ्यांच्या वर्णपटांत सांपडावींत पण इतरांत सांपडूं नयेत असें कां ? — यांचें समाधानकारक उत्तर साहांच्या सिद्धांतानें दिलें. साहांची विचारप्रणाली समजण्यासाठीं अणूंची घटना विचारांत घेतली पाहिजे. अणूंमध्यें ग्रहमालिकेच्या मध्यभागीं जसा सूर्य, तसे परमाणु असून त्या भोंवतीं ग्रहाप्रमाणें विद्युदणु ( Electrons ) भ्रमण करीत असतात. कांहीं परमाणूंच्या जवळ असतात तर कांहीं दूर असतात. यापैकीं जे अगदीं बाहेरच्या कक्षेंत असतात त्यांच्या पासून त्या त्या द्रव्याचा वर्णपट मिळतो. कधीं कधीं उष्णतामान जास्त असलें तर यांतील एखादादुसरा विद्युदणु अणूपासून पूर्णपणें अलग होतो. या उष्णतेमुळें विद्युदणु अलग होण्याला ' औष्मिक अयमन ' ( Thermal Ionisation ) म्हणतात. यामुळें अणूच्या घटनेंत फरक होतो व अर्थात् त्याच्या वर्णपटामध्येंहि बदल होतो. म्हणजे ज्या रेषा साध्या अणूच्या वर्णपटामध्यें दिसतात, त्या या नवीन बदललेल्या अणूच्या वर्णपटांत दिसत नाहींत, तर निराळ्याच दिसूं लागतात. यावरून असें ठरतें कीं ताऱ्यापासून मिळणारा वर्णपट निव्वळ त्याच्यांत असणाऱ्या मूलतत्त्वांवरच अवलंबून राहातो असें नसून त्याच्या उष्णतामानावरहि अवलंबून आहे. किती उष्णतामानांत अणूच्या घटनेंत कसा फरक होईल याचें साहांनीं गणित करून ताऱ्यांचें उष्णतामान आणि त्यांचा वर्णपट याची जोड घालून दिली. ज्या काळांत त्यांनीं हें संशोधन केलें त्या काळीं या विषयाची प्रगति इतकी थोडी झालेली होती कीं या कामाला फार मोठें महत्त्व प्राप्त झालें , इतकेंच नव्हे तर ज्योतिर्भौतिकी ( Astrophysics )च्या प्रगतीला यामुळें चालना मिळाली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. अणु आणि तारका यांची सांगड प्रथम डॉ. साहांनीं घालून दिली हें निश्चित आहे, आणि विशेष हें कीं त्यांनीं हें काम यूरोपमध्यें जाण्यापूर्वी भारतांतच, कोणाचेंहि मार्गदर्शन नसतांना, स्वतंत्रपणें केलें. पुढें अलाहाबादला असतांना ' रॉयल सोसायटी'कडून मिळालेल्या पंधराशें पौंडाच्या देणगींतून उपकरणें खरेदीकरून त्यांनीं आपल्या कांहीं शिष्यांच्या साहाय्यानें प्रायोगिक संशोधन करून आपल्या सिद्धांताचें प्रात्यक्षिक करून दाखविलें. समाधानाची गोष्ट अशी कीं या त्यांच्या महत्त्वपूर्ण संशोधनाचें वेळींच चीज झालें. १९२५ च्या ' इंडिअन सायन्स कांग्रेस'च्या गणित आणि भौतिक विभागाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. १९२७ मध्यें ते F. R. S. झाले. त्याच वर्षी प्रसिद्ध इटालियन शास्त्रज्ञ व्होल्टा याच्या शंभराव्या पुण्यतिथीनिमित्त झालेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेस भारताचे प्रतिनिधि म्हणून त्यांस निमंत्रण आलें. १९३४ सालीं ते इंडिअन सायन्स कांग्रेसचे मुख्य अध्यक्ष होते.

या त्यांच्या संशोधनाचें महत्त्व त्या वेळच्या मोठ्या शास्त्रज्ञांनीं ओळखलें व त्यावर आइनस्टाइन्, हेल, रसेल, एडिंग्टन् इत्यादिकांनीं गौरवपूर्ण अभिप्राय दिले. प्रो. आइन्स्टाइन् म्हणाले "Dr M.N. Saha has won an honoured










name in the whole scientific world ... .... अमेरिकेंतील प्रिन्स्टन विद्यापीठाचे प्रो. रसेल म्हणाले 'In my opinion you have made a contribution to astro-physics which is of the highest value and importance and opens great opportunities for future ad-vance ... ... your predictions about the lines of the alkali metals in the sunspot Spectrum have been com-pletely verified.'

डॉ. साहांची शास्त्रीय कामगिरी निव्वळ आपल्या विभागांत संशोधन करीत बसण्याइतकी मर्यादित नव्हती. संशोधन आणि विचारविनिमयासाठीं शास्त्रज्ञांना एकत्र आणणाऱ्या संस्था स्थापण्यांत त्यांनीं पुढाकार घेतला. U. P. Academy of Sciences' त्यांच्याच परिश्रमामुळें १९३१ मध्यें स्थापन झाली. पुढें याच संस्थेचें रूपांतर होऊन तिला १९३४ मध्यें National Academy of Sci-ences हें नांव मिळालें. याशिवाय सर्व देशासाठीं इंग्लंडच्या Royal Society प्रमाणें भारतांत एक संस्था काढावी या कल्पनेस त्यांनींच चालना दिली. याप्रमाणें पुढें National Institute of Sciences ही संस्था निघाली.

डॉ. साहांनीं आपला शास्त्रीय दृष्टिकोन संकुचित कधींच ठेवला नाहीं. आपल्या विषयाखेरीज इतर शास्त्रीय विषयांचाहि ते सखोल अभ्यास करीत. शास्त्रीय प्रगतीचा, मानवाचें जीवनमान सुधारण्याकडे उपयोग झाला पाहिजे हीच त्यांची नेहमीची भूमिका असे. याचाच परिणाम म्हणजे त्यांनीं दामोदर खोरें योजनेंत अत्यंत कळकळीनें पुढाकार घेतला, Indian Science news Association ही संस्था व Science and Culture हें तिचें मुखपत्र स्थापन केलें; १९३८ सालीं पं. जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं National Plan-ning Committee स्थापन करण्यांत त्यांनींच पुढाकार घेतला. या प्रकारच्या त्यांच्या चळवळीस राजकारण असें पुष्कळ लोकांनी नांव दिलें. 'डॉ. साहा राजकारणाऐवजीं आपल्या विषयांत जास्त लक्ष घालतील तर बरें होईल' असे उद्गारहि कांहीं मोठ्या पुढाऱ्यांनीं काढले. पण, स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर देशाची भरभराट होण्यास व्यापार, उद्योग-धंदे या सर्वांनाच शास्त्रीय प्रगतीच्या उपयोगाची गरज आहे ह्या जाणीवेमुळें व देशप्रेम हें त्यांच्या रक्तांतच मुरलें होतें म्हणूनच त्यांनीं अशा प्रकारच्या राजकारणांत लक्ष घातलें. त्यांचें स्वतःचें याबद्दल काय म्हणणें होतें हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईलः--

"But science and technics are as important for administration now-a-days as law and order. I have gradually glided into polities be-cause I wanted to be of some use to the country in my own humble way ......" याच उद्देशानें ते १९५१ सालीं स्वतंत्र सभासद म्हणून लोकसभेस उभे राहिले व इतर सर्व उमेदवारांचा पराभव करून पुष्कळशा बहुमतानें निवडून आले. आधीं त्यांचा विचार कॉंग्रेसच्या तिकिटावर उभे राहण्याचा होता. पण त्यांना कॉंग्रेसचें तिकिट मिळालें नाहीं. कॉंग्रेसच्या औद्योगिक धोरणावर ते नेहमी टीका करीत. चरखा, खादी व ग्रामोद्योग यांनीं राष्ट्राच्या उद्योगधंद्यांची हवी तशी वाढ होणार नाहीं असें त्यांचें मत होतें. त्यांचा स्वभावच असा होता कीं कोणत्याहि एका पक्षाच्या शिस्तींत बसणें त्यांना शक्य नव्हतें. स्वतःच्या व्यक्तिमत्त्वावर त्यांचा दांडगा विश्वास होता. राज्यसत्ताच जर शास्त्रज्ञांची असती तर कदाचित् सत्तारूढ पक्षांत त्यांना स्थान मिळालें असतें. पण








जगाच्या इतिहासांत शास्त्राला कितीहि महत्त्व मिळालें तरी शास्त्रज्ञांचे हातीं सत्ता कधीं आलेली नाहीं. उलट राजकारणपटु पुढारी आपल्या सत्तेच्या राजकारणांत शास्त्रज्ञांचा उपयोग तेवढा करून घेतात. डॉ. साहा राजकारणी पुरुष होते असें त्यांचे शिष्य तरी म्हणणार नाहींत.

## आठवणी व स्वभाववर्णन

डॉ. मेघनाद साहा यांच्या अंगीं उद्योगशीलता फार होती. कुशाग्र बुद्धिमत्ता व दीर्घोद्योग हे दोनहि गुण एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं असलेले क्वचितच आढळतात. पण साहांचे ठिकाणीं या दोहोंचा दुर्मिळ संगम होता. त्यांना कामाचा उरक फारच मोठा असे. त्याचें मुख्य कारण कोणतेंहि काम ते अत्यंत एकाग्रतेनें करीत. महाशालेंतील त्यांची कामाची खोली अशा ठिकाणीं होती कीं तिच्या दारावरून विद्यार्थी, शिक्षक–आदींची नेहमी बरीच वर्दळ असे व त्यामुळें साहजिकच अधूनमधून गडबड, गोंगाट होई. पण डॉ. साहा कामांत एकदां डोकें खुपसून बसले – मग तें वाचन असो वा लेखन असो – कीं त्यांना आंवतीभंवतीच्या परिस्थितीचें मुळीं भानच नसे. यामुळें प्रयागच्या उन्हाळ्यांतील ११७°–११८° तपमानांतसुद्धा त्यांच्या कामांत कधीं खंड पडला नाहीं.

विद्यार्थ्यांविषयी डॉ. साहांना फार आत्मीयता असे. त्यांनीं विद्यार्थ्यांशीं वागतांना कधी यत्किंचित्हि प्रांतभेद केला नाहीं. त्यांचे पाठ फारच उद्बोधक व माहितीपूर्ण असत. त्यांच्यामध्यें वक्तृत्व जरी विशेष नसलें तरी त्यांचीं व्याख्यानें भरीव असत व विषय समजावून सांगण्याची त्यांची हातोटी फार चांगली होती. अधूनमधून एम्. एस्सीच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना कांहीं प्रश्न अगोदर देऊन पुढच्या वेळीं वर्गांत त्या प्रश्नांवर स्वतःचे उपस्थितींत त्यांच्याकडून चर्चा करवून घेत. त्याचा विद्यार्थ्यांना अर्थात् फारच उपयोग होई. संशोधनासाठीं त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या विद्यार्थ्यांचा त्यांच्याशीं अधिक निकट संबंध येई. त्यामुळें या विद्यार्थ्यांशीं त्यांच्या वागण्यांत साहजिकच अधिक मोकळेपणा व अनौपचारिकपणा असे. त्यांना एकदा कांहीं मोठा आजार ( mucus colitis ) झाला होता. त्यांत २–३ दिवस ते अस्वस्थ होते. त्या वेळीं आम्हीं विद्यार्थीगण त्यांच्या शुश्रूषेसाठीं विशेषतः रात्रीचे वेळीं, आळीपाळीनें त्यांचे घरीं जात असूं.

स्वतःची बुद्धि इतकी कुशाग्र व कामाचा उरक एवढा प्रचंड असूनहि संशोधक विद्यार्थ्यांकडूनच्या कामासंबंधी डॉ. साहांची अपेक्षा अगदीं अल्प असे. मात्र विद्यार्थी प्रामाणिकपणें काम करीत आहे किंवा नाहीं हें ते काळजीपूर्वक पहात. संशोधनकार्यांत विद्यार्थ्यांना कोणताहि अडथळा येऊन कामाचा निष्कारण खोळंबा होऊं नये यासाठीं त्यांनीं दोन गोष्टी प्रामुख्यानें केल्या होत्या. एक तर सबंध भौतिक-विभागा ( Physics Department ) च्या सर्व कुलुपांची गुरू-किल्ली (masterkey) त्यांच्यापैकीं वरिष्ठ विद्यार्थ्यांजवळ देऊन ठेवलेली असे. त्यामुळें भांडारा-(store)पासून तों वाचनालयापर्यंत कोणत्याहि भागांत अप्रतिहत संचार करणें, व कोणत्याहि वेळीं-अवेळीं सवडीनें प्रयोगशाळेंत जाऊन काम करणें त्या विद्यार्थ्यांना शक्य होई. दुसरें म्हणजे प्रयोगासाठीं कांहीं किरकोळ वस्तूंची आवश्यकता लागल्यास त्यांच्या अनुज्ञेची वाट पहात न बसतां त्यांच्या अनुपस्थितींत परभारें तेथल्या सायन्टिफिक इन्स्ट्रुमेन्ट कंपनींत निरोप धाडून हव्या त्या वस्तू मागवून घेण्याचे अधिकार त्यांनीं विद्यार्थ्यांना देऊन ठेवले होते. तसें न केल्यामुळें कामाचा खोळंबा झाल्यास ते रागावत.

दुसरी एक विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे त्यांच्या मार्गदर्शनाखालीं विद्यार्थी जें संशोधन करीत तें शास्त्रीय नियतकालिकांमधून प्रसिद्ध करतेवेळीं त्या लेखांवर बहुधा त्या त्या विद्यार्थ्यांचेंच



अनुक्रमणिका






नांव घालावयास ते सांगत. एखाद्या विषयांत त्यांनीं स्वतःहि बरचसें काम केलेलें असलें आणि विषयहि तितकाच विशेष महत्त्वाच्या असला तरच ते स्वतःचेंहि नांव त्या लेखावर घालीत. बहुतेक मार्गदर्शक, विद्यार्थीना दिलेल्या प्रत्येक समस्येवरील शास्त्रीय संशोधनाचे वृत्तावर स्वतःचेंहि नांव घालतात. कारण त्यांना तेवढ्या सर्व संशोधनांचें श्रेय मिळतें. अर्थात् त्यामुळें विद्यार्थ्यांचें श्रेय बरेंच उणावतें, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां डॉ. साहांच्या या कृतीचें महत्त्व नीट कळतें. असो. याप्रमाणें विद्यार्थ्यांविषयींच्या त्यांच्या सर्वच दृष्टीनीं असणाऱ्या आपुलकीच्या वागणुकीमुळें विद्यार्थ्यांना त्यांच्याविषयीं ‘ गुरूजीं’पेक्षां ‘ पालका’ची भावना अधिक वाटे व तेथील सर्व वातावरण अगदीं घरगुती वाटे. डॉ. साहांचा धाक वाटे हें खरें पण भीति वाटत नसे.

सुप्रसिद्ध भारतीय भौतिकज्ञ, दिल्ली विद्यापीठाचे भौतिकी-विभागप्रमुख प्रा. डॉ. दौलतसिंग कोठारी हे डॉ. साहांचे विशेष आवडते शिष्य. त्यांच्याविषयी त्यांना फार अभिमान वाटे व तो सार्थहि होता. प्रसिद्ध क्ष-किरण तज्ज्ञ बार्क्ला (Barklas) यांच्या हाताखालीं संशोधन केलेले बंगालचे डॉ. खास्तगीर हे तिकडील संशोधन संपवून भारतांत परतले त्यावेळीं प्रयागला आले होते. ‘के’ ( K ) जातीच्या ‘क्ष’ किरणांपेक्षाहि उच्च वारंवारतेचे ‘जे’ (J) किरण असावेत असा त्यावेळीं बार्क्ला व खास्तगीर यांनीं आपल्या संशोधनांवरून निष्कर्ष काढलेला होता. त्याविषयींचें प्रतिवृत्त त्यांनीं ‘ फिलॉसॉफिकल मॅगझिन ’ या नियतकालिकांत वेळोवेळीं प्रसिद्ध केलेलें होतें. याच विषयावर अनौपचारिक व्याख्यान ठेवण्यांत आलें. त्या वेळीं श्री. कोठारी बहुधा एम्. ए . सी च्या द्वितीय वर्षात असावेत. त्यांनीं त्या नियतकालिकांतील सर्व लेख व्याख्यानाच्या पूर्वीच नीट काळजीपूर्वक वाचून काढले होते. व्याख्यान चालू झाल्यावर कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांवर श्री. कोठारी अधूनमधून शंका विचारीत. कार्यक्रम अनौपचारिक स्वरूपाचाच होता. श्री. कोठारी त्यावेळीं तर अंगानें अगदींच किरकोळ होते व त्यांची रहाणीहि फारच साधी असे. त्यामुळें हा कोण फाटका माणूस उगीचच शंका काढतो आहे या समजुतीनें डॉ. खास्तगीर यांनी दोनतीनदां उडवाउडवीचीं उत्तरें देऊन कोठारींना गप्प बसविण्याचा प्रयत्न केला. कोठारींचें अर्थातच त्यामुळें समाधान झालें नव्हतेंच. पण त्याप्रसंगीं त्यांना अधिक कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. पण हें पाहिल्यावर डॉ. साहांनीं उठून डॉ. खास्तगीर यांना स्पष्टपणें सुचविलें कीं “ तुम्ही त्यांना असें वरवर टोलवूं नये ( ‘ you cannot set him aside so lightly like that’ )! त्यांना समर्पक उत्तरें देणें अवश्य आहे. ”

एकदां एम्. एस्. सीच्या वर्गाला शिकवीत असतांना डॉ. साहा यांनीं कांहीं विधान केलें. तें नेमलेल्या पुस्तकांतील माहितीशी जुळणारें नसल्यानें कांहीं विद्यार्थ्यांनी वर्गातच त्यांना तसें सांगितलें. त्यावर त्यांनी अगदीं आत्मविश्वासानें लागलीच उत्तर दिलें कीं त्या लेखकाला कळवा कीं साहा म्हणतात, ‘तें लिहिणें चुकीचें आहे. ’ कधींकधीं पुस्तकांत अमूक अमूक आहे अशी शंका विद्यार्थ्यांनीं काढल्यास व पुस्तकांतील माहिती चुकीची असल्यास ते म्हणावयाचे पुस्तकें म्हणजे कांहीं ‘ वेदवचनें ’ नव्हत ! ( Books are not scriptures ).

डॉ. साहांना आपलीं कामें आपण स्वतः करण्यांत मुळींच कमीपणा वाटत नसे. त्यांचें घर महाशालेच्या जवळ होतें. तेव्हां ते ५–७ जाड जाड पुस्तकांचा गठ्ठा दोन्ही हातांनीं सावरत सावरत स्वतःच घरीं घेऊन जात. गड्याचे हातीं बहुधा धाडीत नसत किंवा आम्ही कोणी त्यांच्या बरोबर










असलों व ‘ पुस्तकें आमच्यापाशीं द्या ’ म्हटलें तरी देत नसत. त्यांनीं स्वतःचा बंगला बांधल्यावर तो बराच दूर असल्यामुळें ते दुचाकीवरून महाशाळेंत येत व पुस्तकें एका लहान चामडी पेटींत घालून ती दुचाकीच्या मागें बांधून आणीत. पुढें मग त्यांनीं मोटर विकत घेतली.

एकदां प्रयोग-शाळेंत प्रयोगासाठीं आणून ठेवलेल्या क्लोरिनच्या नळकांड्या ( chlorine cylinder ) मधून तो वायु हळूहळू बाहेर येऊं लागला व खोली वायूनें भरून गेली. त्या दिवशीं सुट्टी असल्यानें प्रयोगशाळा बंद होती. पण शेजारच्या रसायन-विभागांतील एक प्राध्यापक त्यांच्या प्रयोगशाळेंत आले होते. त्यांच्या लक्षांत ही गोष्ट आली व त्यांनी डॉ. साहांकडे निरोप धाडला. तेवढ्यांत आमच्या विभागाचे कांहीं विद्यार्थी व गडीहि सुदैवानें तेथें येऊन पोहचले. पण डॉ. साहा हे गडी वा विद्यार्थी यांना नुसत्या आज्ञा देतच न बसतां दारें, खिडक्या उघडणें, वायूमुळें उपकरणें बाईट होऊं नयेत म्हणून तीं त्या खोलींतून हलविणें इत्यादि सर्व कामें स्वत: झटून करीत होते. क्लोरिनचा दर्प, उग्रता व विषारीपणा याची ज्याला कल्पना वा अनुभव आहे त्यालाच त्या परिस्थितींत काम करणें किती अवघड असेल हें कळूं शकेल.

डॉ. साहांच्या विद्यार्थ्यांपैकीं कांहीं संशोधन-क्षेत्रांत चमकत आहेत. त्यांत दौलतसिंग कोठारी, रमेश मजुमदार, पी. के. किच्लू, डब्लयू. एम्. वैद्य इत्यादींची गणना प्रामुख्यानें होते. अखिलभारतीय स्पर्धा – परीक्षांमध्यें वा तत्सम प्रांतिक परीक्षांमध्यें यशस्वी होऊन सध्यां मोठ्या अधिकारांच्या स्थानीं तर त्यांचे अनेक विद्यार्थी आहेत. त्यामध्यें वि. गं. ओक ( आय. सी. एस् ) – प्रयाग मुख्य न्यायालयाचे न्यायाधीश, आत्माचरण ( आय् सी. एस ), शारदिन्दु बसू ( वायु-मान-वेधशाळांचे संचालक), मलूरकर, सेनगुप्त, लक्ष्मी सहाय माथूर, अमरनाथ टंडन इत्यादि याच विभागांमधील विविध शाखाप्रमुख आहेत. डॉ. तोष्णिवाल हे मुंबईस शास्त्रीय उपकरणांची विक्री करणाऱ्या एका मोठ्या संस्थेचे संचालक आहेत. ग्यान मुकर्जी हे चित्रपट-सृष्टींतील त्यांच्या कार्यामुळें सर्वश्रुतच आहेत.

डॉ. साहांची रहाणी साधी असे. महाशाळेंत जरी ते नेहमीं कोट-पॅन्ट घालून येत तरी घरीं ते धोतर सदरा वापरीत व पुष्कळदां सुट्टीच्या दिवसांत ते याच वेषांत प्रयोगशाळेंत येत. ते नुसतेच थोर भौतिकज्ञ नव्हते तर त्यांनीं अनेक क्षेत्रांत प्रावीण्य संपादिलेलें होतें. ते पट्टीचे पोहणारे होते. बंगाली, संस्कृत, पाली, इंग्रजी, जर्मन व फ्रेंच या भाषा त्यांना उत्तम अवगत होत्या व इटालियन भाषेचाहि त्यांचा अभ्यास त्या वेळीं चालू असे. गणित हा तर त्यांचा मूळ विषयच व ज्योतिर्भौतिकींतील त्यांच्या मुख्य संशोधनामुळें खगोलशास्त्राचाहि त्यांचा अभ्यास किती खोल होता हें सहज लक्षांत येईल. त्या व्यतिरिक्त रसायनशास्त्राचा त्यांचा फार चांगला अभ्यास असे. भूगर्भशास्त्राचे ग्रंथ ते वैयक्तिक आवड म्हणून वाचीत. त्याचप्रमाणें इतिहासाचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. व इतके विविध विषय ते तितक्याच सुलभतेनें लक्षांतहि ठेवूं शकत.

एका प्रसंगीं एका प्रयोगामध्यें संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या कांहीं चुकीमुळें एका मोठ्या उपकरणांत भरलेल्या उदजन वायूचा स्फोट होऊन तो विद्यार्थी त्या अपघातांतून जरी सुदैवानें संपूर्णतया बचावला तरी उपकरणाची कांहींशी मोडतोड झालीच. ती किती प्रमाणांत झाली ह्याची त्यावेळीं कांहींच कल्पना नव्हती. उपकरण ६–७ सहस्र रुपयांचें होतें. गोष्ट १९२८चे उन्हाळयांतली आहे. त्यावेळीं सध्याच्या मानानें बरीच स्वस्ताई होती. डॉ. साहा त्यावेळीं घरीं होते. अपघाताचें वृत्त त्यांना सांगण्यास विद्यार्थी भीतभीतच त्यांच्याकडे गेला. पण त्यानें त्यांना वृत्त थोडक्यांत सांगितल्यावर अपघात कां व कसा झाला

[ पुढील मजकूर पान ३३ वर पहा ]











जॉर्ज पोलान्यी : अनु. – श्री. अशोक रा. केळकर

# टॅस्मेनिआ विद्यापीठांतील कारभार

आपण अनेकदां पाहतों कीं, घटनात्मक बाबींसंबंधीं विचार करायचा आपल्याला सहसा कंटाळा असतो, पण जेव्हां तसा विचार करण्याची वेळ येते तेव्हां गोष्टी एकदम विकोपालाच गेलेल्या असतात. टॅस्मेनिया विद्यापीठांतील गेल्या दोनतीन वर्षांतील घडामोडी हें याचेंच एक प्रत्यंतर आहे.

## पार्श्वभूमि

ऑस्ट्रेलियन संघराज्यांतील स्वायत्त घटकांपैकीं टॅस्मेनिया हा एक आहे. तीन लक्ष लोकसंख्या असलेल्या या लहानशा बेटामधील वसाहत बरीचशी अलीकडची म्हणजे १८५० नंतरची आहे. शेती आणि फळबागा या उत्पन्नाच्या मुख्य बाबी असून राहणीचें मान युरोपशीं तुलना करतां फारच चांगलें आहे. आपल्या देशांत जी ऊर्जितावस्था आहे ती आपण आपल्या स्वतःच्या कष्टानें निर्माण केली आहे, अशी बहुजनसमाजाची भावना,—स्वकष्टानें पायावर उभे राहणाऱ्या माणसाविषयीं आदर–भावनेची परंपरा समाजांत निर्माण झालेली आहे. त्यामुळें आपल्या केवळ बुद्धीवर जगूं पाहणाऱ्या आणि वरवर पाहतां शारीरिक श्रम न करणाऱ्या विद्यार्जक वर्गाबद्दल इतर लोकांची भूमिका फारशी आदराची दिसून येत नाहीं.

अशा या भूमीवर ज्ञानाला वाहिलेली एक संघटना सुस्थिर उभारण्याचा प्रयत्न, म्हणजे १८९० सालीं होबर्ट या राजधानीच्या शहरीं विद्यापीठाची स्थापना हा होय. जेथें सर्व कारभार शिक्षक आपला आपण पाहतात अशा ऑक्सफर्ड् वा केंब्रिज् – सारख्या जुन्या व संपन्न विद्यापीठापेक्षां टॅस्मेनियांतील विद्यापीठ वेगळेंच आहे. या विद्यापीठाचें नातें लंडन, मँचेस्टर सारख्या red–brick नांवानें ओळखल्या जाणाऱ्या विद्यापीठांशीं जमणारें आहे. स्थानिक लोकांनीं सरकारी मदत आणि व्यापारी संस्थांकडून देणग्या या रूपानें पैसा पुरवावा आणि युनिव्हर्सिटी कौन्सिलनें त्याचा हिशेबीवृत्तीनें विनियोग करावा असा यांचा कारभार असतो. लोकशाहीच्या तत्त्वानुसार ज्यांनीं पैसे पुरवावयाचे त्यांच्यामधील किंवा त्यांना मान्य अशा प्रतिष्ठित लोकांपैकीं प्रतिनिधी या कौन्सिलवर रहावेत हें ओघानें आलेंच. अशा लोकांकडून ज्ञानसाधनेला आवश्यक अशा संकेतांची कदर कितपत ठेवली जाते किंवा, निराळ्या शब्दांत सांगायचें तर, लोकशाही विद्यापीठीय कारभाराला पुरी पडते का नाहीं, यावर या विद्यापीठांचें यशापयश अवलंबून आहे.

अध्यापक आणि विद्यार्थी मिळून विद्यापीठ बनतें. टॅस्मेनिया विद्यापीठ आणि त्याची नियामक घटना व कौन्सिल यांच्या झगड्याचें मूळ येथें आहे. विद्येच्या अभिवृद्धीबद्दल आपल्या कल्पना व ध्येयें ज्यांना कळत नाहींत वा मान्य नाहींत असे लोक आपल्या डोक्यावर बसले आहेत ही भावना येथील अध्यापकांत रुजली आहे. उलट, ' या प्रोफेसरांना पैशांतलें आणि कारभारांतलें काय कळतें ? त्यांना काम करायचेंहि ठाऊक नाहीं, त्यांनीं आमचें म्हणणें निमूट ऐकावें आणि आमच्या शहाणपणावर विसंबून रहावें ' अशी समाजांतील कर्त्या लोकांची समजूत झालेली आहे.

## प्रकरणाला तोंड फुटलें !

विद्यापीठांतील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक सिड्नी ऑर् आणि त्यांचे इतर ३५ सहकारी यांचें विद्यापीठ कौन्सिलवर गंभीर स्वरूपाचे आरोप करणारें पत्र, होबर्ट

[ George Polanyi यांचा प्रस्तुत लेख मूळ इंग्रजींत Science and Freedom या नियतकालिकांत ( डिसेंबर अंकांत ) आला आहे. विद्यापीठें खरीखुरीं विद्येचीं स्वायत्त पीठें असावींत तशीं तीं बनण्याच्या आड कोणत्या गोष्टी येतात याचें प्रस्तुत लेखांत सोदाहरण विवेचन केलेलें आहे. भारतांतील विद्यापीठांच्या घटनांचें व कारभारांचें निरीक्षण करणाऱ्या वाचकांस तें उद्बोधक वाटेल–– का. सं. ]

येथें निघणाऱ्या ' मर्क्युरी ' पत्रांत ऑक्टोबर १९५४ मध्यें प्रसिद्ध झालें आणि अध्यापकांची कौन्सिल-विरुद्ध फिर्याद जनतेसमोर आली.

विद्यापीठाच्या कौन्सिलमध्यें चॅन्सेलर, व्हाइसचॅन्सेलर, शिक्षणमंत्री, दुय्यम शाळांतर्फे सात प्रतिनिधी, पांच वकील, एक डॉक्टर, तीन उद्योगधंद्यांचे प्रतिनिधी, आणि अध्यापक व माजी विद्यार्थी यांचे फक्त चार प्रतिनिधी इतक्यांचा समावेश आहे. या कौन्सिलनें आपली अनास्था, हलगर्जीपणा, आणि गैरकारभार यांमुळें जनता आणि सरकार यांचा विश्वासघात केला आहे असें विद्यापीठांतील अध्यापकांच्या तक्रारीचें सार आहे. प्राध्यापक ऑर आपल्या पत्रांत म्हणतात : ' विद्यापीठाचें कार्य सुयोग्य दिशेनें आणि पद्धतीनें चालूं ठेवण्यास कौन्सिल असमर्थ ठरलें आहे. एखाद्या विद्यापीठाचें कौन्सिल म्हणजे कांहीं एखाद्या कंपनीचें डायरेक्टर-बोर्ड नव्हे. त्याचें वाजवी कार्य म्हणजे विद्यार्जकांना त्यांचें समाजऋण फेडण्यासाठीं जें स्वास्थ व जी सामग्री लागते ती त्यांना उपलब्ध होत राहण्याची व्यवस्था करणें. '

कौन्सिल या बाबतींत आपल्या मर्यादांचें अतिक्रमण करीत आलें आहे एवढेंच नव्हे, तर या मर्यादांची त्याला ओळखच नाहीं हें दाखविण्यासाठीं ऑर यांनीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. १९४८ सालीं कौन्सिलनें मॅट्रिक्युलेशन परीक्षा सोपी करण्याचा निर्णय प्राध्यापकमंडळा ( Professorial Board ) च्या विरोधाला धुडकावून घेतला; त्यामुळें प्राध्यापक आणि कौन्सिल यांचे संबंध तेढीचे व अविश्वासाचे रहात गेले. यानंतर विद्यार्थ्यांच्या वसतिगृह, अभ्यासगृह इत्यादींबद्दलच्या आणि प्राध्यापकांच्या वेतन, नोकरीच्या अटी इत्यादींबद्दलच्या तक्रारी वाढतच होत्या. याबद्दल त्यांनीं कौन्सिलला शेवटीं आवेदन सादर केलें यावर ऑक्टोबर १९५५ मध्यें भरलेल्या कौन्सिलचे बैठकींत कळस झाला. कौन्सिलचे अध्यक्ष व चॅन्सेलर सर जॉन मॉरिस यांनीं हा आमचा अपमान, बेअदबी, बदनामी वगैरे आहे, या शब्दांत या तक्रारींची संभावना केली.

विद्यापीठाचा गाडा याप्रमाणें मोडून पडला. पण हें कबूल करण्यास टॅस्मेनियन सरकार राजी नव्हतें. प्राध्यापकमंडळ व कौन्सिल यांची अनौपचारिकरीत्या एक संयुक्त बैठक घेऊन समझोता करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण मतभेद तीव्र असून तडजोड अशक्य आहे एवढेंच यांतून निष्पन्न झालें. अखेर विरोधी पक्षानें लोकसभेंत या प्रकरणांत रॉयल कमिशन नेमून जाहीर चौकशी करावी अशी मागणी केली आणि ती कशीबशी संमतहि झाली. फेब्रुअरी १९५५ मध्यें सेवानिवृत्त न्यायाधीश वॉकर आणि जोडीला मेलबर्नचे प्रा. टर्नर व कॅनबेराचे प्रा. ट्रेन्डल अशा तिघांचें कमिशन नेमण्यांत आलें.

## कमिशननें केलेली छाननी

आपल्या अहवालांत कमिशननें स्वच्छपणें आपलें मत दिलें आहे कीं, " परिस्थिति अत्यंत बिघडलेली असून घटनात्मक तरतुदी येथें पुऱ्या घडलेल्या नाहींत आणि यापुढेंहि पडणार नाहींत; चौकशी करण्याची खरोखरच जरूरी होती. या प्रकरणांत जबाबदार व्यक्तींनाच आपल्या कर्तव्याची बरोबर जाणीव नाहीं. त्यांनीं घटनेचा नीट अर्थहि लावला गेला नाहीं. "

वादाच्या बाबी ढोबळ मानानें तीन होत्या : मॅट्रिक्युलेशन परीक्षा, अध्यापकांचें वेतन, आणि विद्यापीठाच्या इमारती आणि साधनसामग्री.

## मॅट्रिक्युलेशन परीक्षा

मध्यवर्ती आणि प्रांतिक सरकारांकडून शालेय शिक्षणाला भरपूर मदत असते, यामुळें अनेक विद्यार्थी शाळांतून बाहेर पडतात. टॅस्मेनियन समाज भरभराटींत आहे; ग्रॅजुएट्स्, विशेषतः शाळाशिक्षक यांना वाढती मागणी आहे. यामध्यें अडचण जर कोणाची असेल तर कॉलेजप्राध्यापकांच्या फाजील अपेक्षा; ते मुलांना नापास करतात ! प्राध्यापकांचें म्हणणें कीं, " मॅट्रिक्युलेशनमध्यें गणितामध्यें फार विद्यार्थी नापास होतात, म्हणून त्यांना सध्यांच्या आठवीइतकेंच गणित पुरे असें म्हणून प्रश्न सुटत नाहीं. असा विद्यार्थी बी. एस्. सी.ला आला तर त्याला आम्ही कॉलेजचा अभ्यास शिकवूं, कीं संशोधनास प्रवृत्त करूं, का आधीं शालेय गणित शिकवीत बसूं ? बरें त्याला गणित नाहीं आलें तर तो पदार्थविज्ञान आणि रसायन काय शिकणार ? फिरून तो पहिल्या वर्षाला नापास झाला तर दोष आमचाच ! " प्राध्यापकमंडळानें जी भूमिका घेतली त्याला सर्वच अध्यापकवर्गाचा पाठिंबा होता.

ग्रॅजुएट्स्चा पुरवठा पुरेसा होत नाहीं तेव्हां मॅट्रि-










क्युलेशनलाच हात घातला पाहिजे हें ओळखून होबार्ट विद्यापीठ कौन्सिलनें चॅन्सेलर व इतर तिघे यांची या-बद्दल सूचना करण्यासाठीं समिति नेमली. परीक्षा सोपी करावी याचा चॅन्सेलरनें जोराचा पाठपुरावा केला पण या समितीनें त्याविरुद्ध निर्णय दिला. प्राध्यापक–मंडळानेंहि एकमतानें विरोध दर्शविला. यावर चॅन्से-लरनें आपली योजना फिरून कौन्सिलमध्यें मांडली; तीसुद्धां अध्यापकांना अधिकच नापसंत व्हावी अशा तऱ्हेनें बदल करून, चॅन्सेलरच्या दराऱ्यामुळें कौन्सिलमधील अध्यापक-प्रतिनिधींनीं जोराचा प्रतिकार केला नाहीं. अध्यापकमंडळाचा सल्लाहि न घेतां परीक्षा १९४८ मध्यें सोपी करण्यांत आली. यावर, अध्यापक - मंडळानें निदान त्यांत कांहीं फेर-सुधारणा करून घेण्यासाठीं खटपट सुरूं केली. तेव्हां या विषयावर आणखी वर्षभर कोणीहि चर्चा करूं नये असा कौन्सिलनें मे १९४९ मध्यें फतवा काढला !

कौन्सिलनें जे फरक घडवून आणले त्यापेक्षां ज्या पद्धतीनें ते घडवून आणले त्यामुळें कौन्सिल आणि प्राध्यापकमंडळ यांचे संबंध बिघडले. यानंतर चॅन्सेलरनें एकदां एका विद्यार्थ्याला मॅट्रिक्युलेशन परीक्षेबद्दल कांहीं सवलत द्यावी अशी व्हाइसचॅन्सेलरमार्फत प्राध्यापकमंडळाकडे हुकूमवजा शिफारस केली. त्यावर सदर विद्यार्थ्यानें हा अर्ज चॅन्सेलरकडे न करतां ' योग्य त्या मार्गानें पुन्हां केला ' तर ही सवलत त्याला मिळावी असा ठराव प्राध्यापकमंडळानें केला. पण इतका सोंवळा ठरावहि चॅन्सेलरला रुचला नाहीं. " हा ठराव म्हणजे आपल्या पदाचा अपमान आहे, आणि मला शहाणपणा मंडळानें शिकवूं नये, तो आक्षेपकारक भाग आपल्या सभेच्या नोंदींतून काढून टाकावा " अशी चॅन्सेलरनें भूमिका घेतली, आणि अध्यापकमंडळानें माघार घेतली.

## प्राध्यापकांची आर्थिक स्थिति

टॅस्मेनियांतील प्राध्यापकांचे पगार सिडनी, मेलबर्न आदि इतर विद्यापीठांतील अध्यापकांपेक्षां नेहमींच कमी रहात आले आहेत. १९१७ पर्यंत ते इतरांच्या निम्म्यानें इतके होते. सध्यां ते पुष्कळच बरे असले तरी ते वाढवितांना जी चालढकल, दिरंगाई, जो कद्रूपणा दाखविण्यांत आला त्यामुळें अध्यापकांच्या भावना दुखावल्याच गेल्या. " ज्या दर्जाच्या व्यक्तींनीं सिडनी, मेलबर्न विद्यापीठांना सामाजिक स्थान प्राप्त करून दिलें आणि थोर परंपरा मागें ठेवल्या त्या दर्जाच्या व्यक्ती टॅस्मेनिया विद्यापीठाकडे तितक्या संख्येनें कां आकर्षित होऊं शकल्या नाहींत याचें मूळ येथील अत्यंत कमी पगारांत सापडतें " असा कमिशननें स्पष्ट अभिप्राय दिला आहे.

१९५३ सालीं व्हाइसचॅन्सेलरांच्या परिषदेनें सर्व आस्ट्रेलियांत बेसिक पगार सालिना किमान २५०० ऑस्ट्रेलियन पौंडापर्यंत वाढवावे याला मान्यता दिली. याप्रमाणें इतर ठिकाणीं पगार वाढलेहि. टॅस्मेनियामध्यें मात्र कौन्सिल आणि अध्यापकसंघ ( Staff Association ) यांच्या दरम्यान कटकटी चालूं राहिल्या. अखेर अध्यापकांनीं कौन्सिल तत्त्वतः सुद्धां आपल्या मागण्या कबूल करीत नाहीं हें पाहून हा प्रश्न तिऱ्हाइत लवादाकडे सोंपवावा अशी विद्यापीठीय संकेताविरुद्ध सूचना केली. त्याबद्दल कौन्सिलची प्रति-क्रिया चॅन्सेलरच्या शब्दांत वर दिलीच आहे. मोठ्या मेहेरबानीनें सध्याचें मान २१५० पौंड देण्यांत आलें ! ( सिडनीमध्यें तें ३००० पौंड आहे. )

कमिशननें याबद्दल अशी सूचना केली आहे कीं, अध्यापक आणि कौन्सिल यांचे प्रतिनिधी घेऊन एक फिनॅन्स कमिटी नेमावी, तिच्या अध्यक्षस्थानीं एक अर्थव्यवहारतज्ज्ञ ( ' a graduate experienced in large-scale finance ' ) असावा, तिनें ठराविक मुदतीनें वेतनांची फेरतपासणी करावी. " प्राध्यापकांच्या लायकीबद्दल कौन्सिलच्या कांहीं सभासदांच्या व्यक्तिगत मतांवर " ह्यासारखी महत्त्वाची गोष्ट अवलंबून ठेवूं नये असाहि अभिप्राय कमिशननें दिला आहे.

विद्यापीठाच्या इमारती व गैरसोयी याबद्दल प्राध्यापक आणि विद्यार्थी यांनीं जें निवेदन केलें आणि ज्यामुळें चॅन्सेलरांचा एवढा भडका उडाला तें बाजूला ठेवलें तरी कमिशननें कांहीं बांधकामाबद्दल वापरलेले शब्दप्रयोग पाहण्यासारखे आहेतः– ' माती-च्या झोपड्या ', ' गोठे ', ' जुनाट ', ' अंधेऱ्या ', ' जीवितास असुरक्षित ', ' अस्वच्छ ', ' अपुरी जागा ', ' फर्निचर बेताचेंच '. १९४४ मध्यें नवीन बांधकामाची योजना आखण्यांत आली होती, परंतु लठ्ठ फी देऊन प्लॅन काढून घेण्याखेरीज कोणत्याहि








प्रकारें १९५३ पर्यंत कौन्सिलनें हात हलविले नाहींत, मिळालेल्या ग्रॅन्ट्स् 'लॅप्स' होऊं दिल्या, आणि १९५३ सालीं सरकारनें सर्वच योजना रद्द करून कमी खर्चाची योजना मागितली तेव्हां माघार घेतली !

या निरुत्साही परिस्थितींतसुद्धां अध्यापकवर्ग आनंदानें काम करीत आहे. मध्यंतरीं उभारलेल्या कांहीं तात्पुरत्या इमारतींवरसुद्धां खूष आहे, मोठ्या बादशाही महालांची त्याला अपेक्षा दिसत नाहीं असेंहि कमिशननें लिहून ठेवलें आहे आणि कौन्सिलला अनास्था आणि कचखाऊपणा याबद्दल ठपका दिला आहे.

## याला जबाबदार कोण ?

अशा स्वरूपाच्या अहवालामध्यें जितकी स्पष्ट शब्दयोजना करणें शक्य असतें तितकी करून कमिशननें या संबंधानें पहिला मान सध्याच्या चॅन्सेलरला दिला आहे. " आदर्श चॅन्सेलरला आवश्यक असे सर्व गुण सध्याच्या चॅन्सेलरांमध्यें एकवटले आहेत. सर्वोच्च न्यायासन आणि राज्यांतील जबाबदारीच्या जागा ते भूषवीत असून त्यांची कळकळ, निर्भयता, कामाचा उरक, सुसंस्कृतपणा वादातीत आहेत. टॅस्मेनिया विद्यापीठाला त्याचा सध्याचा दर्जा आणि विस्तार प्राप्त करून देण्यासाठीं त्यांनीं अतिशय श्रम घेतले. " पगारवाढ, संशोधनासाठीं रजा, वृद्धापकाळीं काम करण्याची संधि अशा गोष्टींच्याबाबत ते सतत अध्यापकांची बाजू घेत आले आहेत असाहि विश्वास कमिशननें प्रकट केला आहे. पण त्याचबरोबर कमिशननें असेंहि म्हटलें आहे कीं चॅन्सेलर म्हणजे दुसरा व्हाइस-चॅन्सेलर किंवा कार्याधिकारी नव्हे, कामें झपाटून टाकणारा सरकारी अधिकारी किंवा मॅनेजिंग डायरेक्टर तो नव्हे, तर तो केवळ एक पक्षातीत सभाधिपति आहे. यावर कमिशनचें म्हणणें पाहण्यासारखें आहे : " आपणांस कौन्सिल सतत विरोध करीत आलें आहे, अशी चॅन्सेलरांची तक्रार आहे. या तक्रारीवरून हेंच सिद्ध होतें कीं वादग्रस्त विषयांत एक बाजू घेऊन इतरांशीं दोन हात करण्याची यांची तयारी होती. त्यांच्यावर टीका केली तर तो त्यांच्या पदाचा अपमान आहे या त्यांच्या म्हणण्यावरूनहि हेंच दिसतें. "

व्हाइसचॅन्सेलरबद्दल कमिशननें म्हटलें आहे : " हे टॅस्मेनियांतच केवळ नव्हे तर सर्व ऑस्ट्रेलियांत प्रिय आणि आदरणीय आहेत. अध्यापकांची बाजू मांडणें आणि कौन्सिलशीं सहकार्य करणें या दोनहि गोष्टी यांनीं कसोशीनें केल्या. परंतु पुढेंपुढें अध्यापक आणि चॅन्सेलर व कौन्सिल यांच्या झगड्यांत स्वतंत्र भूमिका न घेतां वरिष्ठांना चिकटून राहिल्यामुळें यांनीं अध्यापकांचा रोष ओढवून घेतला. विद्यापीठें बाहेरच्या लोकांचें कौन्सिल नसतांनाहि उत्तम रीतीनें चालूं शकतील, नव्हे पूर्वी चालली आहेत; विद्यार्जकांशिवाय मात्र त्यांना अस्तित्वच नाहीं ही गोष्ट यापुढें सर्वांनींच लक्षांत ठेवलेली बरी. "

अध्यापकसंघानें आपल्या ध्येयसिद्धीसाठीं स्वीकारलेले मार्ग बिनशहाणपणाचे ( unwise ) होते, असें कमिशननें म्हटलें असून त्याला कारण दिरंगाईमुळें जी विफलता ( frustration ) आली तें होय असें म्हटलें आहे.

कमिशननें ज्या शिफारशी केल्या आहेत. त्यांपैकीं मुख्य अशा : कौन्सिलमध्यें निदान निम्मे प्रतिनिधी ग्रॅजुएट्स, अध्यापकवर्ग आणि विद्यार्थी यांचे असावेत; कौन्सिल हें सरतेशेवटीं ग्रॅजुएट्सचा संघ ( Convocation, general body of graduates ) याला जबाबदार असावें; परीक्षा, अभ्यासक्रम आदि बाबतींत प्राध्यापकमंडळाला जास्त अधिकार असावेत; प्राध्यापक आणि बाहेरचे सभासद यांच्या मिश्र समित्यांनीं पगार, इमारती इत्यादि बाबी पहाव्यात. कॉलेजांच्या व्यवस्थापनांत अध्यापकांना अधिक प्रतिनिधित्व मिळावें.— या शिफारसींतून विद्यापीठ स्वयंशासित असावें या तत्त्वाचाच पाठपुरावा कमिशननें केला आहे.

सध्याचें कौन्सिल शक्य तितक्या लवकर बदलून नवीन तत्त्वानुसार निवडणुका घडवून आणाव्यात ही कमिशनची सर्वांत महत्त्वाची शिफारस आहे. ( सध्याचे चॅन्सेलर आणि व्हाइस–चॅन्सेलर यांच्या मुदती अनुक्रमें १९५६ आणि १९५७ मध्यें संपतात हेंहि येथें लक्षांत घेतलें पाहिजे. ) अध्यापकवर्गांत कांहीं बदल करावा असें कमिशननें कोठेंहि सुचविलेलें नाहीं.

टॅस्मेनियन पार्लमेंटनें नवीन कायदा बहुमतानें संमत करून कमिशननें सुचविलेल्या बऱ्याच सुधारणा









अनुक्रमणिका

त्यांत घेतल्या आहेत. मात्र तितक्याच बहुमतानें असेंहि ठरलें कीं सध्याच्या कौन्सिलवर अविश्वास व्यक्त होईल असें कांहीं करूं नये. सध्याच्या कौन्सिलची पुनर्घटना लगोलग न होतां दोन वर्षांपर्यंत होत रहावी. यामुळें या कौन्सिलला सध्याचा चॅन्सेलर पुन्हा निवडणें आणि आपल्याला हवा असा नवा व्हाइसचॅन्सेलर नेमणें शक्य होणार आहे.

पार्लमेंटच्या या निर्णयामुळें ज्या प्राध्यापकांनीं कमिशनकरवीं चौकशी व्हावी यासाठीं व नंतरहि पुढाकार घेतला होता अशा प्राध्यापकांवर गदा येऊं पहात आहे.

'मर्क्युरी' पत्राचे संपादक अलिकडील एका लेखांत म्हणतात : "जर प्राध्यापकांना इतक्या वाईट परिस्थितींत काम करावें लागत असेल, तर त्यांनीं अन्यत्र आपल्याला अनुकूल ( congenial ) अशा वातावरणाच्या शोधांत रहावें हें बरें." आरोग्यमंत्री डॉ. टर्नबुल हे तर पार्लमेंटमध्यें स्पष्टच म्हणाले होते कीं, "ज्यांची चॅन्सेलर मॉरिस यांच्यापुढें कांहींच लायकी नाहीं, अशांनीं ( म्हणजे प्राध्यापकांनीं ) त्यांच्यावर असा निंद्य आणि दुष्ट हल्ला करावा ना ! प्राध्यापक-मंडळाची वागणूक त्याला खास शोभली नाहीं. अशा लोकांना न जुमानतां, मॉरिस यांनीं विद्यापीठ या अवस्थेला आणलें याबद्दल आपण त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत." पण यावर ताण म्हणजे टॅस्मेनियांच्या बिशपसाहेबांचें प्रसिद्ध झालेलें पत्र. आतांच्या कौन्सिलला लवकर रजा दिली पाहिजे या सूचनेंतील सूडबुद्धीचा निषेध करून ते सुचवितात कीं अंतर्गत एकोप्यानें आणि विद्यापीठाच्या नियामक वर्गाशीं जुळवून घेऊन ( in harmony ) काम करील असा अध्यापकवर्ग असणें जरूर आहे आणि त्यासाठीं वेळोवेळीं सध्यांच्या अध्यापकवर्गांत जरूर तो बदलहि करावा. –'सूडबुद्धी'ची टोपी कुणाला बसते हें सुज्ञ ओळखतीलच.

परंतु या रीतीनें नागरिकस्वातंत्र्य टॅस्मेनियामध्यें धोक्यांत येणार नाहीं. तेथील जबाबदार नागरिक विद्यापीठांतर्गत व्यवहार जितक्या मोकळेपणानें आणि स्वतंत्रपणें चालतील तितक्या प्रमाणांतच त्या विद्यापीठाचा समाजाला उपयोग आहे हें सुबुद्धपणें लक्षांत घेतील अशी आशा आहे.

---

## डॉ. मेघनाद साहा ( पान २८ वरून पुढें चालू )

याविषयीं दोषाचें एक अक्षरहि विद्यार्थ्याला न बोलतां त्यांनीं त्याला पहिला प्रश्न विचारला तो हा कीं "तुम्हा कुणाला कुठें लागलें तर नाहीं ना ? ( None of you is hurt ? )" व नंतर लगेच दुचाकीवर बसून ते प्रयोगशाळेंत आले व त्यांनीं उपकरणाची पाहणी केली. सुदैवानें उपकरण बऱ्याच श्रमानें कां होईना पण नीट होण्याच्या अवस्थेंत होतें ही गोष्ट निराळी. पण त्यांनीं तेव्हां वा नंतरहि केव्हांच त्या घटनेविषयीं त्या विद्यार्थ्याला एका शब्दानेंहि दोष दिला नाहीं; मग त्याच्यावर रागावणें तर दूरच राहो ! अशा त्यांच्या सौजन्यपूर्ण वागणुकीमुळें विद्यार्थ्यांना त्यांच्याविषयीं जिव्हाळा व आपलेपणा वाटत असल्यास नवल तें काय ?

एकदा प्रयोगशाळेंतल्या एका गड्यानें कांहीं चोरी केल्याचें उघडकीस आलें. हा गडी अगदीं तरुण व बुद्धिमान् होता. प्रयोगशाळेंत त्यापूर्वी त्यानें कांहीं वर्षें समाधानकारक व चांगलें काम केलें होतें. साहांनीं या प्रकरणाची चौकशी करून तो गडी दोषी आहे याची निश्चिति पटतांच रागानें त्याला कामावरून काढून टाकल्याचें सांगितलें व ते आपल्या उद्योगाला लागले. पण त्यांच्या डोक्यांत तो प्रश्न घोळतच होता. थोड्या वेळानें ते म्हणाले, "जोग ! त्या गड्याला म्हणावें कीं, तूं त्यागपत्र दे म्हणजे त्याला दुसरीकडे चाकरी मिळण्यास त्रास पडणार नाहीं." आणखी थोड्या वेळानें ते पुन: म्हणाले 'जोग, त्या गड्याला म्हणावें तूं रजेसाठीं आवेदन कर !' याप्रमाणें त्यांनी त्या गड्याची अधिकांत अधिक सोय पाहिली.

वरवर पाहणारास कठोर व उद्धट वाटणारी ही व्यक्ति अंत:करणांत अत्यंत मृदु व लोकोत्तर होती.







श्री. मोरेश्वर स. गोसावी

# बँक-रेट आणि आर्थिक नियंत्रण

**इंग्लंडमध्यें बँक–रेट कां वाढविण्यांत आला ?**

ग्रेट-ब्रिटनचे अर्थमंत्री श्री. हॅरॉल्ड मॅकमिलन यांनीं आपल्या देशाचा बँक-रेट नुकताच ५॥ टक्क्यांवर नेऊन बँक – रेटचा उच्चांक प्रस्थापित केला. देशांत झालेली चलनवाढ कमी करून आर्थिक स्थिति सुधारण्यासाठीं दि० २३ फेब्रु. १९५५ ला पूर्वीचा ३॥ टक्के रेट ४॥ टक्के करण्यांत आला होता. तोच गेल्या महिन्याच्या १६ तारखेला ५॥ टक्यांवर नेण्यांत आला. १९३१ मधील जागतिक मंदीच्या काळांपासून एवढा मोठा बँक-रेट यंदा प्रथमच करण्यांत आला आहे. त्यावेळीं मंदीची लाट सर्वत्र पसरली होती. आज इंग्लंडात सुबत्ता नांदत आहे. तेव्हां अत्यंत तीव्र मंदी व भरमसाट चलती अशा दोन्ही काळांत आर्थिक सुस्थिति काबूंत आणण्यासाठीं बँक – रेट हें प्रभावी साधन ठरावें हा अर्थशास्त्रांतील एक चमत्कारच होय. दोन्ही वेळच्या परिस्थितींत जमीन – अस्मानाचें अंतर असलें तरी पौंड – स्टार्लिंगला स्थैर्य देणें हा प्रश्न दोन्हीं वेळीं महत्त्वाचा असल्यानें बँक-रेटचें महत्त्व विशेष आहे.

कोणत्याहि देशांत मध्यवर्ती बँक ही, सरकारची बँकर, इतरांना कर्ज देणारी संस्था व पैशाच्या बाजारांतील इतर संस्थांचें आश्रयस्थान, वगैरे कारणामुळें महत्त्वाचें स्थान पटकावून असते. मोठमोठ्या व महत्त्वाच्या गिऱ्हाइकांकडून येणारी कर्जाची मागणी तिला तांतडीनें भागविण्यासाठीं पुरेशी रोकड जवळ बाळगावी लागते. ही बँक ज्यावेळी कर्ज देते त्या वेळीं त्या कर्जावर व्याज आकारते; व कर्जदारांना प्रोत्साहन देण्याचें नसलें तर व्याजाचा दर वाढविते. म्हणजे कित्येक जण कर्ज घेण्याचें टाळतात तर कित्येकजण कर्ज घेण्यापूर्वी विशेष विचार करतात. आपणांस मान्य असलेल्या तारणांवर कर्ज देण्याच्या तिच्या दरास बँक-रेट किंवा डिस्कौंट-रेट म्हणतात. हा रेट वाढविला कीं कर्जाची मागणी कमी होते. मध्यवर्ती बँकेवर अवलंबून असलेल्या इतर आर्थिक संस्थाहि आपले दर तदनुसार व पैशाच्या बाजारांतील पैसा महाग करून कर्जें घेण्याच्या प्रवृत्तीस आळा घालतात. बँकांतील पैसा कर्जाच्या स्वरूपानें बाहेर न जातां बकांतील ठेवींत भर पडते, मध्यवर्ती बँकेंतील रोकड वाढते व अशाप्रकारें बँक-रेट वाढविल्यानें आर्थिक समतोल राखण्यास मदत होते.

बँक ऑफ इंग्लंडनें ४॥ टक्क्याचा ५॥ टक्के रेट करून कर्जाऊ रकमेवरील व्याजाचा बोजा वाढविला व कर्ज घेण्याच्या प्रवृत्तीस आळा घातला. मध्यतरींच्या काळांत झालेल्या चलनवाढीवर ती आटोक्यांत आणण्यासाठीं हा एक रामबाण उपाय आहे. इंग्लंडांत युद्धकाळांत लोकांच्या खर्चावर कडक नियंत्रणें होतीं. खरेदीवर निर्बंध होते. साहजिकच नंतरच्या काळांत लोक चैनीच्या जिनसांवर जास्त पैसा खर्चूं लागले. आयात निर्गतीपेक्षां खूप वाढूं लागली व आयात मालाच्या किंमती वाढल्यानें व निर्गत-मालाच्या किंमती उतरल्यानें परराष्ट्रीय देणें वाढत चाललें. तेव्हां लोकांच्या खरेद्या नियंत्रित करून परराष्ट्रीय देण्यास पायबंद घालण्याचे दृष्टीनें बँक-रेट या प्रभावी साधनाचा अवलंब करण्यांत आला.

दीर्घकाळपर्यंत परराष्ट्रीय देण्या-घेण्यांत तूट येत असल्यानें इंग्लडांतील पौंडाची किंमत डॉलरच्या मानानें बरीच घसरलेली आहे. बँक-रेट वाढवून ती सुधारण्याचा उद्देश आहे. देशाला न परवडणाऱ्या अंतर्गत खरेद्या, पौंडाच्या पतींत घट व आयातींत भरमसाठ वाढ या सर्वांवर जालीम उपाय म्हणजे बँकांकडून कर्जें मिळणें महाग व अवघड करणें व त्यासाठीं बँक-रेट वाढविणें हा होय. गेल्यावर्षी ३॥ चा ४॥ टक्के करूनहि परिस्थिति आटोक्यांत न आल्यानें तो आतां ५॥ टक्के करण्यांत आला आहे. तसेंच त्याबरोबर इतरहि बरेच निर्बंध लादण्यांत आले आहेत.

इतर लादलेल्या निर्बंधांत ' पाव व दूध यांच्या किंमतींत होणारी वाढ ' याचा उल्लेख प्रथम करण्यस हवा. या पदार्थांवरील सबिसडी ( subsidy ) कमी केल्यामुळें त्यांच्या किंमती अनुक्रमें १३ टक्के व ८ टक्के वाढतील. दुसरें म्हणजे हप्तेबंदीच्या खरेदीवर नवीं नियंत्रणें घालण्यांत आलीं आहेत. मोठमोठ्या चैनीच्या वस्तू हप्तेबंदीनें ( Hire-purchase ) नें विकत घेण्याची पद्धति इंग्लंडांत फारच लोकप्रिय आहे. अशा संस्थेचे व्यवहार त्यांना मिळणाऱ्या कर्जावर चालत असल्यानें, त्यांना मिळणारें कर्जच



अनुक्रमणिका







महाग केल्यास, गिऱ्हाईकाकडून ते जास्त पैसे घेतील व मग खरेदीस आळा बसेल असा हेतु आहे. त्या दृष्टीनें आज या व्यवहारांत द्याव्या लागणाऱ्या १५ टक्के किंमतीचा पहिला हप्ता (Down-payment) २० टक्के केला असून, भारी चैनीच्या वस्तूंवर तर हा हप्ता ३३ $\frac{१}{३}$ टक्क्यांवरून ५० टक्क्यांवर नेलेला आहे. आणि हप्ते देण्याची मुदतहि ४ वर्षांवरून २ वर्षांवर आणण्यांत आली आहे. हप्तेबंदीच्या खरेद्यांवर अशीं नवीन नियंत्रणें व बँकेकडून कर्ज मिळतांना आंखडता हात यामुळें अशा संस्थाचे दुहेरी हाल होणार आहेत. पण आर्थिक स्थैर्याच्या दृष्टीनें ते अटळ आहेत असें म्हटलें जातें.

तसेंच राष्ट्रीयीकरण केलेल्या उद्योगधंद्याच्या वाढीवर अमाप पैसा खर्च होत गेला तर चलनवाढ आटोक्यांत राहणार नाहीं. म्हणून एकंदर गुंतवणूक-रकमेंत बरीच कपात करण्यांत आली आहे. रेल्वेंत २२ लक्ष पौंड, वीज-सुधारणा १९ लक्ष पौंड, कोळसा- ५ लक्ष पौंड व वैमानिक सुधारणा २॥ लक्ष पौंड अशा योजना लांबणीवर टाकून एकंदर रकमेंत बरीच कपात केली आहे. अशाप्रकारें बँकरेट वाढीबरोबरच अशा योजना आखल्यानें आर्थिक परिस्थिति समतोल राखण्याचें उद्दिष्ट साधण्यासाठीं प्रयत्न केले जात आहेत. पण इंग्लंडसारख्या संपन्न राष्ट्रानें एका हातानें भरमसाट भांडवलाच्या योजना पुढें आणाव्या व दुसऱ्या हातानें, कॉमनवेल्थ राष्ट्रांना त्यांच्या प्रगतीस वेळेवर मदत न करतां अगदींच प्राचीन आर्थिक धोरणाचा पुरस्कार करावा हें कसेंसेंच वाटतें. यामुळें आर्थिक समतोलपणा राखण्यास मदत झाली तरी पुढच्या प्रगतीचें पाऊल रोखून धरल्यासारखें होईल असें वाटतें.

## भारतांतील प्रतिक्रिया

इंग्लंडांतील ह्या बँक-रेट वाढीची भारतांत काय प्रतिक्रिया होईल हें पहाणें अवश्य आहे. ज्या वेळीं हा बँक-रेट वाढला त्याच सुमारास रिझर्व्ह बँकेनें आपलें नांव गिल्ट-एज ( Gilt-edge ) बाजारांतून काढून घेतलें व लोकांना निरनिराळे तर्क करण्यास जास्तच संधि दिली. बँक ऑफ इंग्लंडचें इंग्लंडांत जें स्थान तेंच रिझर्व्ह बँकेचें भारतांत. दोन्ही बँका बँकरेटच्या द्वारा पैशाचे वापरावर नियंत्रण ठेवूं पहातात. नोव्हेंबर १९३५ पासून ५१ पर्यंत रिझर्व्ह बँकेचा बँक-रेट ३ टक्के होता. नोव्हे. १९५१ मध्यें बँकांचीं कर्जें ( अवघड व ) महाग करणें व सट्टेबाजीला आळा घालणें यासाठीं बँक-रेट ३॥ टक्के करण्यांत आला व त्याचबरोबर इतरहि बंधनें घालण्यांत आलीं. आज हाच रेट कायम आहे.

इंग्लंडचा बँक रेट वाढल्यानें भारतांतील बँकरेटहि वाढेल असें म्हटलें जातें व यांस दोन कारणें दाखविलीं जातात. एक – भारतांत बिलमार्केटची स्थापना झाल्यापासून इतर बँका रिझर्व्ह बँकेकडून, हुंड्यांवर मिळणाऱ्या कर्जाच्या व्याजाचा दर कमी असल्यानें, सरकारी रोख्यावर कर्ज घेईनाशा झाल्या आहेत. पण सर्वच बँकांना हुंड्यावर कर्ज मिळविणें शक्य होत नसल्यानें सरकारी रोख्यावर कर्ज – मागणी वाढूं लागेल व त्यामुळें बँक – रेट वाढवावा लागेल. दुसरें असें कीं इंग्लंडांतील वाढलेल्या रेटमुळें भारतांतील पैशाच्या बाजारांत परराष्ट्रीय व्यापारास लागणाऱ्या पैशाचा बोजा वाढत राहील व चलनवाढ टाळण्यासाठीं रेट वाढवावा लागेल.

परन्तु इंग्लंडसारख्या पुढारलेल्या राष्ट्रांत सर्वच व्यवहार बँकेमार्फत चालत असल्यानें मध्यवर्ती बँकेची पैशाच्या बाजारांत हुकमत चालते व बँकरेट हें प्रभावी साधन ठरतें. भारतांत इतर सुधारलेल्या प्रगत देशाच्या मानानें आर्थिक क्षेत्रांत बँकांचा प्रसार व महत्त्व हवें तेवढें वाढलेलें नाहीं. सर्व एक्सचेंज बँका रिझर्व्ह बँकेवर संपूर्णतया अवलंबून नाहींत. त्यामुळें बँकरेट हें एकमेव साधन फारसें प्रभावी ठरणार नाहीं. रिझर्व्ह बँकेच्या वाढत्या व्यापाबरोबर आर्थिक क्षेत्रांतील तिचें स्थान जास्त स्थिर होत जाईल तसतसें तिचें धोरण आर्थिक व्यवहारांत सर्वमान्य ठरेल.

शिवाय ज्या ठिकाणीं उद्योग व व्यापार यांना विशिष्ट स्थान आहे अशा भारतासारख्या नियोजित अर्थव्यवस्थेंत ( planned economy मध्यें ) सद्यःपरिस्थितींत बँकरेट वाढेल असें वाटत नाहीं. प्रत्यक्षांत वस्तुतः भारतांत संपूर्ण नियोजित अर्थव्यवस्था नाहीं. सट्टेबाजी व स्वतंत्र उद्योग-व्यापार यांना स्थान ( वाव ) आहेच. कमी व्याजाचा दर व सहज मिळणारें कर्ज यामुळें तर त्यांस उत्तेजनच मिळतें. तुटीच्या अंदाजपत्रकामुळें तर अर्थव्यवस्थेवर होणारे दुष्परिणाम टाळण्यासाठीं बँकरेट आटोक्यांत ठेवण्यास हवा. परन्तु आज परिस्थिति अशी आहे कीं पैशाच्या बाजारांत पैसा महाग झाला आहे--अन् त्यामुळें कोणत्याहि प्रकारचा पुढाकार घेण्यास किंवा मार्ग अनुसरण्यांस बँक नाखूष दिसते!









श्री. अच्युत पटवर्धन

# कै. आचार्य नरेंद्र देव

आपल्या समाजजीवनांत गेल्या पन्नास वर्षांत केवढीं स्थित्यंतरें घडून आलीं आहेत आणि केवढ्या थोर विभूति होऊन गेल्या आहेत ! क्रांतिकारी व्यक्ति व सामाजिक स्थित्यंतर यांचा कांहीं अन्योन्य-संबंध असतो का ? माणसाला कालमहिम्यामुळें व्यक्तिमत्त्व प्राप्त होतें कीं अलौकिक व्यक्तींमुळें नवा इतिहास घडतो हें एक कोडें आहे. प्राचीन काळापासून विचारवंतांनीं या प्रश्नाला उत्तर देण्याचा यत्न केला आहे. या प्रश्नावर अद्यापहि मोठा वाद आहे. या वादांत आपण शिरलों नाहीं तरी हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे याबद्दल दुमत होणार नाहीं.

### समाजजीवनाशीं एकरूप होऊं पाहणारें व्यक्तिमत्त्व

आचार्य नरेंद्र देव भोंवतालच्या समाजजीवनाशीं इतके तद्रूप झाले होते कीं सामाजिक इतिहासापासून अलग असें त्यांच्यामध्यें काय होतें हें सांगणें कठीण आहे. त्यांच्या गुणांची यादी करतां येईल, त्यांच्या थोरवीचा तपशील सांगतां येईल पण त्यांच्या व्यक्तिमत्त्वामध्यें जें ओज होतें, जी गतिशीलता होती, जें विभूतिमत्त्व होतें तें सामाजिक पार्श्वभूमीवरच प्रगट होई. भारतीय जीवनमूल्यांवर त्यांची गाढ श्रद्धा होती. भारतीय संस्कृतीचा त्यांच्यावर खोल संस्कार झालेला होता. त्यांचा व्यासंग सखोल होता. जीवन त्यागमय होतें. पण हा त्यांचा पिंड असला तरी समाजप्रगतीचा मार्ग शोधून काढण्यासाठीं त्यांचें अखंड चाललेलें चिंतन – मनन व समाजाच्या सर्व धडपडींशीं एकरूप होण्याचा त्यांचा हव्यास ध्यानांत घेतल्याशिवाय त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें खरें दर्शन घडणार नाहीं. ते एका पिढीचे प्रतिनिधि होते. एका पिढीच्या सामाजिक आकांक्षा व ध्येयें त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत प्रतिबिंबित झालेलीं होतीं. त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील हे दोन्ही घटकावयव सारख्याच महत्त्वाचे आहेत.

### अनासक्त स्नेह व वस्तुनिष्ठ गुणग्राहकता

त्यांची वृत्ति अत्यंत संकोची, निरहंकारी व संवेदनाशील होती. त्यांच्याशीं ज्यांचा निकटचा व जिव्हाळयाचा संबंध आला त्यांना त्यांचा अकृत्रिम स्नेहभाव व ऋजुता पाहून आश्चर्य वाटे. कीर्ति मिळविलेलीं व योग्यता पावलेलीं, व्युत्पन्न म्हणून नांवाजलेलीं माणसें खाजगी जीवनांत इतकीं साधीं, अकृत्रिम, पापभीरु व निर्व्याज स्नेहपूर्ण अशीं क्वचितच राहिलेलीं दिसतात. आचार्यांचा हा विशेष आहे कीं त्यांच्या सार्वजनिक कीर्तीची सांवली त्यांच्या अंतःकरणावर कधीं पडूं शकली नाहीं. सर्व जग आपल्याकडे न्याहाळून बघत आहे व त्यांच्या डोळयांत भरेल अशी आपली वागणूक झाली पाहिजे, अशी जाणीव त्यांना कधींच नव्हती. त्यांच्या आचारा-विचारांत नाट्य असें मुळींच नव्हतें. बाल-सुलभ सरळपणा व सहानुभूति होती. त्यांच्या व्यासंगाला हिंदी-उर्दू व इंग्रजी या तीन भाषांतील वक्तृत्वाची जोड मिळाल्यामुळें तरुण मनावर ते तेव्हांच परिणाम करूं शकत. शेंकडों विद्यार्थी त्यांचे अनुयायी व पुजारी बनले होते.

त्यांचा जन्म फैजाबाद येथील पिढीजाद खानदानी कुटुंबांत झालेला-पण ऐष-आरामाविषयीं व सुखासीन प्रतिष्ठितपणाविषयीं त्यांना जन्मभर तिटकारा होता. पुढें त्याग व वक्तृत्व हे दोन हुकमी पत्ते हातांत असून अधिकाराविषयीं पराकाष्ठेची उदासीनता होती. स्वतःला कांहींच नको असल्यामुळें राजकारणांत त्यांना अनासक्ति सहज प्राप्त झालेली होती व त्यामुळें वैयक्तिक हेव्या-देव्याचा वांटा त्यांना कधीं स्पर्श करूं शकला नाहीं. भिन्न विचाराच्या लोकांचें व विरोधकांचेंहि ते वस्तुनिष्ठ बुद्धीनें मूल्यमापन करूं शकत. प्रकृति इतकी क्षीण झाली असतां तें समाजवादीपक्षाच्या अध्यक्षपदाची कठीण जबाबदारी त्यांनीं आपल्या खांद्यावर घेतली यांत त्यांची अलौकिक कर्तव्यनिष्ठा तर होतीच पण त्यावेळीं त्यांच्यामधील अनासक्त स्नेहभावना व वस्तुनिष्ठ गुणग्राहकता प्रकर्षानें



अनुक्रमणिका








व्यक्त झाली. डॉ. लोहियांनीं बंड पुकारलें, व्यक्तिशः नरेंद्रदेवांवर आरोप केले पण आचार्यांच्या मनांत त्यांच्याबद्दल व्यक्तिगत क्रोध किंवा चीड चुकूनहि कधीं निर्माण झाली नाहीं. त्यांना दुःख झालें, वेदना झाल्या, हळहळ वाटली पण चीड किंवा क्रोध कधीं आला नाहीं. हाच त्यांचा विशेष आहे. एखाद्या सद्वृत्त गृहस्थाश्रमी माणसाप्रमाणें त्यांनीं राजकीय कार्य केलें. त्यांत अलौकिकतेची मिजास नव्हती, त्यागाचा दिमाख नव्हता. अत्यंत सहजता व साधेपणा होता. ते एकदम वाहवले जात नसत. त्यांच्यामध्यें धीरोदात्त गंभीरपणा होता. समुद्राप्रमाणें दैनंदिन राजकारणांतील आवेग व ऊर्मी ते जिरवूं शकत. त्यामुळें त्यांचें चारित्र्य शंभर नंबरी नाण्याप्रमाणें स्वयंप्रकाशित होतें. खरेपणाची 'राजमुद्रा' त्यांच्या सर्व कृतीवर अगदीं ठळठळीतपणें उमटलेली दिसे. जितके ते भिडस्त, विनयशील तितकच निःस्पृह व सडेतोड. ते जेथें जेथें गेले तेथें तेथें त्यांच्या व्यक्तिमत्त्वानें मोहित झालेला भक्तजनांचा व स्नेही मंडळीचा गराडा तेजोवलयाप्रमाणें त्यांच्या भोंवतीं सदा विलसत असलेला दिसे. त्यांचें दार सर्वांना सर्वकाळ उघडें. पंडित मालवीयांप्रमाणें आचार्यांचा दरबार अष्टौप्रहर चालूंच असे. काशीविद्यापीठांत, उत्तर-प्रदेश-कॉंग्रेसच्या दप्तरांत, बनारस युनिव्हर्सिटींत वा लखनौ विद्यापीठांत त्यांच्या संपर्कांत आलेले लोक त्यांचें जन्मभर कृतज्ञतेनें स्मरण करतील व त्यांनीं दिलेल्या संस्कारांचें आस्थेनें रक्षण करतील. हिंदुस्थानांतील व विशेषतः उत्तरप्रदेशांतील नवयुवकांचें ते स्फूर्तिस्थान व श्रद्धास्थान बनले होते. आचार्य जावडेकर व साने गुरुजी या दोहोंच्या गुणांचें कांहीं प्रमाणांत आचार्यांमध्यें मिश्रण झालेलें दिसे.

कर्तृत्वाला चारित्र्याची जोड मिळाली म्हणजे मानवी जीवनांत किती उदात्तता येते, ह्याची जाणीव आचार्यांकडे पाहून होई. जमिनींत कितीहि पिकें काढलीं, तरी तिचा मूळ उपजाऊपणा एकच असतो, त्याप्रमाणें कर्तृत्वाचे नवनवीन प्रांत काबीज केले तरी चारित्र्य बदलत नाहीं. तें खुलतें येवढेंच.

### जीवनदृष्टि देणारे आचार्य

आ. नरेंद्रदेव यांचा जन्म १९ व्या शतकांत झाला असला तरी त्यांची कारकीर्द विसाव्या शतकांत प्रथमार्धांमध्यें झाली विसाव्या शतकांतील जागतिक घटनांचा संस्कार त्यांच्या बुद्धीवर स्पष्टपणें झालेला होता. आधुनिक विचार किंवा दृष्टिकोण बनवणारांमध्यें, तो प्रचलित करणारांमध्यें, आचार्यांची गणना होईल. कॉंग्रेस व समाजवादी पक्ष यांच्या द्वारें साऱ्या देशाला त्यांनीं एक अमोल वैचारिक देणगी दिलेली आहे. विचार व आचार यांच्यामध्यें त्यांच्या मनांत कधीं तफावत नसल्यामुळें नेतृत्वाचा एक आदर्श ते निर्माण करूं शकले. विचाराला आचाराची कसोटी हवी व विचाराला उत्कट भावनेची व समाजहितबुद्धीची बैठक हवी असें ते नेहमी म्हणत. हीच त्यांची जीवनसाधना होती.

कॉलेजांत असल्यापासूनच त्यांचा राजकारणाकडे ओढा. म्युर सेंट्रल कॉलेजमध्यें ते विद्यार्थी असतांना टिळकांचें अलाहाबादला आगमन झालें. म्युर कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं गाडीचे घोडे सोडून जमावानें गाडी रेटीत मिरवणूक काढली होती. आचार्यांनीं देशभक्तीचा तारुण्यसुलभ उन्माद उपभोगला होता. त्यांनीं क्रांतिकारकांशीं स्नेहसंबंध जोडला होता. लो. टिळकांच्या होमरूल लीगचें कार्य अंगावर घेऊन राजकारणाचा 'श्रीगणेशा' त्यांनीं केला. याच वेळीं पं. नेहरूंचा व त्यांचा परिचय झाला. याच परिचयाचें कालांतरानें गाढ स्नेहांत रूपांतर झालें. भारतीय राजकारण हा दोन परस्परविरुद्ध शक्तींचा संघर्ष आहे या गोष्टीची जाणीव त्यांना लोकमान्यांनीं करून दिली. नंतर असहकारयुग सुरूं होतांच १९२१ सालीं वकिली पेशा समाप्त करून ते काशीविद्यापीठांतील आचार्य बनले. अध्ययन-अध्यापन व संशोधन या कार्यामध्यें त्यांना नितांत आनंद व समाधान लाभलें. काशी-विद्यापीठांतील आपली सेवा हाच आपल्या हातून घडलेला श्रेष्ठ पुरुषार्थ आहे असें ते मानीत. "हीच माझी पुंजी आहे" असें ते म्हणत. शेकडों तरुणांना त्यांनीं संस्कार दिले व जीवनदृष्टि प्रदान केली. आज उत्तर प्रदेशांत क्वचितच कोणी अधिकारी मंत्री किंवा शिक्षक असेल कीं ज्याच्यावर आचार्यांचे संस्कार झालेले दिसणार नाहींत. उत्तरप्रदेशचे मुख्य मंत्री विधिमंडळांत त्यांना श्रद्धांजलि वाहतांना, ढसढसा रडत होते! शेकडों ठिकाणीं स्वयंस्फूर्त हरताळ पडले. आचार्य नरेंद्र देव हे अवघ्या राष्ट्राला आदरणीय व भूषणभूत वाटत होते.



अनुक्रमणिका






## भारतीय राष्ट्रवादावर समाजवादी दृष्टीची छाप

भारतीय राष्ट्रवाद दोन परस्परविरोधी सत्ताकेंद्रांचा संघर्ष आहे हा सिद्धान्त टिळकांनीं देशापुढें मांडला. परंतु शस्त्रविहीन देशाला या संघर्षांत टिकाव कसा धरतां येईल, या प्रश्नाला म. गांधींनीं एक कार्यपद्धति देऊन देशावर ओढवलेलें तमोगुणी वैफल्याचें आवरण दूर केलें, व पुरुषार्थाला मार्ग मोकळा करून दिला. साम्राज्यसत्तेविरुद्ध जो उठाव मांडवलदारी युगांत वाढत असतो त्याचें वर्गस्वरूप ध्यानांत घेऊन आर्थिक असंतोष डोळस करण्यांत एका नव्या शक्तीचा आविष्कार कसा होऊं शकेल या समाजवादी दर्शनाचा प्रत्यय नरेंद्रदेवांना १९३०–३२ च्या काळांत आला. रशियांतील क्रांतीचें सखोल अध्ययन करून भारतीय समाजवादाला लोकशाहीचीच बैठक मिळाली पाहिजे व ती समाजवादी संघटना भारतीय राष्ट्रवादाची अविभाज्य आधारशक्ति बनली पाहिजे, किंबहुना भारतीय राष्ट्रवादावर या समाजवादी दृष्टीचीच छाप पडली तर स्वातंत्र्योत्तर समस्या सुलभ होऊं शकेल इत्यादि मूलग्राही विचार आ. नरेंद्रदेवांच्याकडून त्यांच्या समकालीन तरुणांना मिळाले. राष्ट्रवादाचा विकास केवळ ( पार्लमेंटरी डेमॉक्रसीमधून ) प्रातिनिधिक स्वायत्तशासनामधून कधींच पूर्णपणें होऊं शकणार नाहीं, मागासलेल्या देशांत जनमनांतील स्वातंत्र्यप्रेरणा ही आर्थिक विकासाच्या तीव्र निकडीची दुसरी पर्यायी जाणीव आहे, यासाठीं प्रातिनिधिक लोकशासनाचें पर्यवसान लोकशाही समाजवादांतच झालें पाहिजे, हें सत्य नरेंद्रदेवांनीं इतक्या अचूकपणें देशाला दिलें कीं, त्यामुळें समाजवादी पक्षाला जशी तत्त्वशुद्ध समाजदर्शनाची बैठक मिळाली आहे त्याहूनहि आजच्या पिढीच्या सर्वसाधारण विचारी नागरिकाला आधुनिक भारताचें ऐतिहासिक कार्य अधिक स्पष्टपणें दिसूं शकत आहे.

क्रांति ही केवळ तत्त्वदर्शनानें होत नसते. इतिहास बनविण्याचें कार्य केवळ कार्यक्रमाचा आराखडा बनवून सिद्ध होऊं शकत नाहीं. क्रांतिक्षण आणि त्या क्रांतिक्षणाला सर्वस्व पणाला लावून लढा करण्याचा मगदूर या गोष्टी पुस्तकांत मिळणार नाहींत. ही व्यक्तित्वाची जादू आहे. असें नेतृत्व म. गांधींच्या अंगीं आहे, याची प्रांजळ जाणीव आ. नरेंद्रदेवांना होती. म्हणून गांधीजींच्या दृष्टिकोनाशीं आपला मतभेद स्पष्ट दिसत असूनहि लढ्याच्या वेळीं ते गांधीजींपासून कधीं दुरावले नाहींत. उलट, गांधीजींच्या लढ्यांना नव्या नव्या शक्तिप्रवृत्तींचा आधार मिळवून देऊं शकले. आ० नरेंद्रदेवांच्या दूरदृष्टीमुळें समाजवादी पक्ष स्वराज्य मिळेपर्यंत कॉंग्रेसच्या शिस्तींत स्वखुशीनें नांदला आणि कॉंग्रेसला जमीनदारीच्या उन्मूलनासारख्या क्रांतिकारी कार्यक्रमाशीं समरस होतां आलें.

कॉंग्रेसमध्यें लढाऊ प्रवृत्तींचा कोंडमारा होऊं नये परंतु जहाल वृत्तीच्या लोकांनीं अधीरपणें साम्राज्यविरोधी चढाईमध्यें फूट पडूं देऊं नये याबद्दल दक्षता बाळगण्याचा आग्रह हें आ० नरेंद्रदेवांच्या दूरदृष्टीचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. या बाबतींत सुभाषबाबूंचा वाईटपणा घेण्यासहि ते कचरले नाहींत आणि स० वल्लभभाई पटेल यांच्या नाराजीमुळें कॉंग्रेसच्या राजकारणांत स्वतःचें वैयक्तिक स्थान वाढणार नाहीं याचीहि तमा त्यांनीं बाळगली नाहीं.

या सर्व घटनांमध्यें त्यांच्या दृष्टिकोणाची तेजस्वी छाप समाजवादी व राष्ट्रवादी राजकारणावर पडत होती. याचा अर्थ या सर्व गोष्टी त्यांनीं एकट्यांनीं घडविल्या असें सुचविण्याचा उद्देश नाहीं. परंतु ज्या दिशेनें समाजाचा प्रवाह वाहात गेला असतां देशाच्या प्रगतीचें पाऊल झपाट्यानें पुढें पडेल अशी दिशा परिश्रमपूर्वक शोधण्याचा व दिशा सांपडल्यानंतर निग्रहानें तिचा अवलंब करण्याचा कणखरपणा ज्या थोड्या कर्तृत्ववान् पुढाऱ्यांत होता त्यांत आचार्यजींची गणना खासच करावी लागेल. समाजवादी पक्षाला १९३६ पासून १९४६ पर्यंत जें महत्त्वाचें स्थान कॉंग्रेसमध्यें प्राप्त झालें त्यामध्यें आ० नरेंद्रदेव यांचें वैयक्तिक मार्गदर्शन ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. हें मान्य झाल्यानंतर आजच्या पिढीच्या सामाजिक दृष्टिकोनावर कशा तऱ्हेचा संस्कार आ० नरेंद्रदेवांच्यामुळें घडला याची कल्पना येऊं शकेल.

## निसर्गविजयाइतकाच मनोविजय महत्त्वाचा

जयप्रकाश आणि नरेंद्रदेव यांच्यामध्यें एक परिस्थितिजन्य फरक पडला. जयप्रकाश अमेरिकेंत शिकत असल्यापासून त्यांच्या दृष्टिकोनावर मार्क्सवादाची, वैज्ञानिक भौतिकवादाची छाप पडली. नरेंद्रदेव भारतीय संस्कृतीचे चहाते. परंतु हिंदु-







समाजव्यवस्थेंतील गंभीर दोष ज्यांनीं स्पष्टपणें पाहिले आहेत, अशा विचारवंतांच्या संपर्कांत ते आलेले. त्यामुळें समाजजीवनांत हिंदुधर्म कसा प्रतिगामी बनतो, विशेषतः जातिभेदाच्या, उच्चनीचतेच्या बुरसटलेल्या कल्पनांमुळें जनता तमोगुणाच्या आहारीं कशी जाते याची कल्पना नरेंद्रदेवांना तरुणपणापासूनच होती. तरीहि समाजाला भौतिक साधनांइतकेंच शीलहि आवश्यक आहे व निसर्गावरील विजयापेक्षां मनोविजयाला गौण स्थान देतां येत नाहीं – हा भारतीय जीवनमूल्यांचा सिद्धान्त त्यांनीं दृष्टीआड केला नाहीं. बौद्धदर्शनाचें सखोल अध्ययन करण्यासाठीं आचार्यांनीं दीर्घ परिश्रम केले. व पाश्चात्त्य समाजवादी संप्रदायांत जी उथळ भौतिकवादी दृष्टि आहे तिला बौद्धदर्शनामधून अधिक प्रगल्भ वैचारिक बैठक मिळवून दिली.

## सामाजिक मूल्यांचें स्वतंत्र चिंतन

आचार्यजींचा समाजवाद दीर्घ व्यासंगावर आधारलेला होता. त्यांचा बौद्धदर्शनाचा व्यासंग सखोल होता. परंतु या व्यासंगाला त्यांनीं अनाग्रही संशोधक वृत्तीची जोड दिली. या त्यांच्या संशोधक वृत्तीमुळें अनेक मौलिक प्रश्नांचें कधीं कधीं मोठें मार्मिक विवेचन ते करीत. याचें एक उदाहरण मी कधींहि विसरूं शकणार नाहीं. भौतिकवाद अपुरा आहे व जीवनांत अध्यात्माचें महत्त्व नाकारून भागणार नाहीं असें जयप्रकाशजी जाहीरपणें सांगूं लागल्यानंतर सामाजिक जीवनाच्या मूल्यांचा वारंवार विचार नरेंद्रदेवहि करीत असत. परंतु नरेंद्रदेवांची बैठक पाश्चात्त्य जडवाद्यांसारखी कधींच नव्हती. यामुळें त्यांना आपल्या दृष्टिकोनांत कांहीं अपुरेपणा भासला नाहीं. याचा खुलासा एक दिवस संभाषणांत त्यांनीं स्वतःच केला: भारतांत जितकीं वेगवेगळीं दर्शनें निर्माण झालीं त्यांत ईश्वरवादी, निरीश्वरवादी, संन्यासमार्गी, कर्ममार्गी, भक्तिमार्गी, द्वैती-अद्वैती, तांत्रिक, शाक्त, बौद्ध, जैन असे अनंत पंथ जरी दिसले तरी हीं सर्वच्या सर्व दर्शनें योगशास्त्रानें केलेलें मनोविश्लेषण समान रूपानें मान्य करतात. मानवी व्यक्तित्वाचें योगमार्गानुसार केलेलें मूल्यमापन आणि पाश्चात्त्य व्यक्तिवादाला अभिप्रेत असलेलें मानवी व्यक्तिमत्त्वाचें मूल्यमापन या दोहोंत जें महत्त्वाचें अंतर आहे तें विचारणीय आहे. समाजवाद पाश्चात्त्य व्यक्तिवादाच्या प्रतिक्रियेंतून निघालेलें दर्शन आहे म्हणून पाश्चात्त्य व्यक्तिवादांतील मूल्यें कशीं सदोष आहेत इतकाच विचार त्यांत आढळतो. त्याहून खोल त्याची दृष्टि गेलेली नाहीं. यामुळें पाश्चात्त्य जडवादाला मनोविज्ञानाच्या क्षेत्रांत अजून पुष्कळ शिकायचें आहे ही गोष्ट आचार्यजींनीं फार मार्मिकपणें विशद करून सांगितली. आणि ती सांगतांना जडवादी व हिंदु धर्मांतील सांप्रदायिक अशा दोन्ही प्रवृत्तींपासून अलिप्त राहून सामाजिक मूल्यांचें स्वतंत्रपणें चिंतन करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली. यामुळेंच त्यांच्या विचारसृष्टींत आधुनिक भारतीय जीवनांतील प्रगतीच्या प्रयत्नांचें, धडपडीचें प्रतिबिंब पाहायला सांपडतें. इतिहासाचा संस्कार ग्रहण करणारें आणि सभोंवतालच्या समाजजीवनाला संस्कार देऊन इतिहास घडविण्याचा मगदूर समाजांत निर्माण करणारें मार्गदर्शक आणि प्रातिनिधिक व्यक्तिमत्त्व हीच नरेंद्रदेवांच्या जीवनचरित्राची थोरवी आहे. त्यांचा देह दीर्घ कालापासून व्याधिजर्जर होता. त्यामुळें देहकष्टाबद्दल ते उदासीन असत. अनेक वर्षांपासून त्यांना दम्याची व्याधि होती. दोन वर्षांपूर्वी ते यूरोपमध्यें गेले असतां आस्ट्रियामध्यें आल्प्स पर्वताच्या जवळ असलेल्या एका गांवीं उपचारासाठीं चार महिने जाऊन राहिले होते. आणि त्यांना चांगला गुणहि आला होता. ते रोज आठ मैल चालूं शकत असत. पण परत येतांच पुन्हां दमा सुरूं झाला. मद्रासचे गव्हर्नर श्रीप्रकाशजी यांची आचार्यांवर फार भक्ति. श्रीप्रकाशजी त्यांच्या प्रकृतीची फार काळजी वाहात. त्यानींच त्यांना कंजीवरम् नजीकच्या आरोग्यकेंद्रांत आग्रह करून नेलें होतें. शेवटीं शेवटीं आचार्यांनीं आशा सोडली होती. यांच्या निधनानें भारताचें झालेलें नुकसान सहजासहजीं भरून येणार नाहीं.

---







डॉ. ना. र. इनामदार

# मलायाच्या स्वातंत्र्याची घोषणा

## साम्यवादावर तोडगा !

८ फेब्रुवारी १९५६ या दिवशीं लंडनमध्यें मलयाचे प्रतिनिधी व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें मलयाला स्वायत्त सरकार देण्याचा करार झाला. तावडतोब संपूर्ण स्वातंत्र्य जरी देण्यांत येणार नसलें तरी कांहीं संरक्षणविषयक तरतुदी ठेवून सर्व खात्यां- मधील अधिकार मलायी जनतेच्या प्रतिनिधींच्या स्वाधीन करण्यांत येणार आहेत. हें स्वायत्त मलायी राष्ट्र कॉमनवेल्थमध्यें राहणार आहे हें उघड आहे. परंतु कालान्तरानें ब्रिटिश कॉमनवेल्थशीं संबंध तोडतां येतील हें करारांत स्पष्टपणें नमुद केलेलें नसलें, तरी तसा अधिकार स्वायत्त मलायी सरकारला नसेल तर तें सरकार स्वतन्त्र नाहीं असें म्हणावें लागेल ! ॲटली-सरकारनें दलित राष्ट्रांना स्वातंत्र्य बहाल करण्याची जी प्रक्रिया सुरू केली ती इतकी प्रबळ होती कीं हुजूर पक्षाच्या सरकारलासुद्धां ती पुढें चालू ठेवणें भाग पडलें आहे हें यावरून सिद्ध होतें. 'न्यू स्टेट्समन ॲन्ड नेशन' या ब्रिटिश साप्ताहिकानें व्यक्त केल्या- प्रमाणें संपूर्ण स्वातंत्र्याखेरीज साम्यवादावर दुसरा तोडगा नाहीं. ("The broad fact is that in the long run there is no alternative to Communism in Malaya except complete independence." Feb. 18.) बोर्निओ, सारावाक, मॅकाओ यांसारख्या वसाहती सोडल्या तर आशियामध्यें आतां परतंत्र देश राहिले नाहींत. दलित राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळण्याच्या ह्या प्रक्रियेला दुसऱ्या महायुद्धामुळें इतक्या झपाट्यानें चालना मिळाली हें निर्विवाद होय. दुसऱ्या महायुद्धामुळें, साम्राज्यवादी राष्ट्रांचा विजय जरी झाला असला तरी त्यांच्या लष्करी व आर्थिक सामर्थ्याचा कणा मोडला. आणि त्यांत दलित राष्ट्रांतील जनता जागृत झालेली. त्यामुळें वसाहती टिकवण्याचे साम्राज्यशाही राष्ट्रांनीं जरी प्रयत्न केले तरी ते यशस्वी होऊं शकले नाहींत. चीनमध्यें साम्यवादाचा विजय झाल्यापासून आशियांतील राजकारणाचा रंग पालटूं लागला आहे. इन्डोचायनाच्या स्वातंत्र्याचा एरवीं उदय झाला नसता. मलयाच्या स्वातंत्र्याची घोषणाहि एरवीं झाली नसती ! हिन्दी महासागर व पॅसिफिक महासागर यांमधील प्रवेशद्वार म्हणून मलाया या द्वीपकल्पाला असाधारण महत्त्व होतें. उत्तरेकडील थायलंड (सयाम) व दक्षिणेकडील जावा आदि बेटें जर कबजांत घेतलीं तर मलाया व सिंगापुर बेट हीं फार काळ ताब्यांत ठेवतां येत नाहींत हें दुसऱ्या महायुद्धांत दिसून आलें. तेव्हां मलाया व सिंगापुर बंदर संरक्षणदृष्ट्या अभेद्य व अजिंक्य होतीं म्हणून त्यांना महत्त्व प्राप्त झालें होतें असें नाहीं. रबर व टिन हीं युद्धासाठीं आवश्यक असलेली कच्ची सामुग्री मलायामध्यें विपुल होती व जगाच्या बाजारपेठेंत त्यांना फार भाव आहे, म्हणून मलायाचें महत्त्व. कम्युनिस्टां- नीं चालवलेल्या गनिमी युद्धामुळें मलाया आपल्या हातून जातो कीं काय या भीतीनें ब्रिटिशांनीं आपली पकड आवळली. पण ब्रिटिश साम्राज्यशाहीला एक लाखावर सैन्य ठेवूनसुद्धां आठ हजार गनिमी कम्यु- निस्टांचा निःपात करतां आला नाहीं. यावरून जो बोध घ्यावयास हवा तो ब्रिटिशांनीं घेतला आणि स्वायत्त सरकार देण्याची घोषणा केली.

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

आशियामधील इतर कांहीं देशांप्रमाणें मलायाचा इतिहास प्राचीन आहे. इन्डोचायनाप्रमाणें व त्याहून- हि अधिक प्रमाणांत मलायामध्यें विविध धर्मांचा व संस्कृतींचा संगम व संघर्ष झालेला आढळून येतो. त्यामुळें मलायाचा इतिहास अखण्ड आढळत नाहीं, त्यांत खाचखळगे आणि वळणें आहेत. पण तो पुरा- तन आहे हें पाश्चात्त्य इतिहासकारांनासुद्धां मान्य आहे. लण्डन विद्यापीठांतील मलाय भाषेचे प्राध्यापक [व माजी मलायन सनदी नोकर] रिचर्ड विन्स्टेट्



अनुक्रमणिका








लिहितात : " प्रचारकी दृष्टि नेहमी संकुचित असते. आणि म्हणून ज्या ब्रिटिश इतिहासकारांनीं मलाया हें राष्ट्र ब्रिटिशांनीं जणुं काय शून्यांतून निर्माण केलें असा आभास उत्पन्न केला आहे. त्यांना ब्रिटिशांची कामगिरी उठून दिसेल अशी पार्श्वभूमिसुद्धां किमान पक्षीं रंगवतां आली नाहीं! ( Propagandist vision is always warped, and the histories that describe Malaya, for example, as if it were created by the British out of the void fail even to provide the background necessary to exhibit their achievements. " – Malaya and Its History by Richard Winstedt, p. 148. ) आज मलाया व सिंगापुरमध्यें जी संमिश्र लोकवस्ती दिसते तिच्यामध्यें इतिहासाचें प्रतिबिम्ब दिसतें. नीग्रो व ऑस्ट्रेलॉइड वंशाचे लोक जंगलांत असल्यामुळें त्यांचा उल्लेख कोणी करीत नाहीं. मलायामध्यें चिनी जरी एकूण लोकसंख्येपैकीं एक तृतीयांश असले तरी सिंगापुरमध्यें ते घवघवीत बहुसंख्येंत [ अकरा लाखांपैकीं आठ लाख ] आहेत. चीन व मलाया यांचा संबंध फार प्राचीन काळापासून चालत आला आहे, हें चिनी प्रवाशांनीं नमूद करून ठेवलें आहे. इन्डोचायनांतल्याप्रमाणें सम्राट् व माण्डलिक असे चीन व मलाया यांमधील संबंध नव्हते. पण मलायांतील राजे व चीनचा सम्राट् यांच्या भेटी होत असत. खुद्द आज इन्डोनेशियन [ वा मंगोलॉइड ] वंशाचे म्हणून ओळखले जाणारे मलायी लोक प्राचीन काळीं इन्डोचायनांतल्याप्रमाणें चीनमधून ( युनान प्रान्तांतून ) आले. इन्डोनेशिया व मलाया यांत भाषिक व वांशिक एकता आहे, इतकेंच नव्हे तर भूतकाळीं जावानें मलायावर ( मलाक्का या बेटावर ) वर्चस्व गाजविलें होतें. भारतीयांचा संबंध इसवीसनापूर्वीपासून वृद्धिंगत होत आला. मलायामध्यें ठिकठिकाणीं संस्कृत शिलालेख सापडले आहेत. त्यावरून बुद्धधर्माच्या उदयापूर्वींहि भारताचे मलायाशीं संबंध होते हें सिद्ध होतें. मलायाचा 'सुवर्णद्वीप' म्हणून संस्कृतमध्यें उल्लेख करण्यात येत असे, यावरून सोन्यासाठीं भारतीय मलायाकडे धांव घेत असत असें अनुमान काढण्यांत येतें. मोठ्या नौकांचा शोध लागल्यामुळें हें दळणवळण सुलभ झालें. बुद्धधर्माच्या प्रसारासाठीं भारतांतून भिक्षू मलायांत येऊं लागले. समुद्रावरील वाऱ्यांचें ज्ञान अरबांना अवगत झाल्यामुळें त्यांना मलायाला इस्लामची शिकवण देतां आली, या कामीं दक्षिण भारत त्यांचा तळ होता. नवव्या शतकांत महायानी 'श्रीविजय' या साम्राज्याचा उदय होईपर्यन्त हिन्दु धर्माचा मलायावर प्रभाव अप्रतिहत होता. अकराव्या शतकांत मजापहित या जावांतील हिन्दु राजानें मलायावर परत कब्जा मिळवला. पण तो फार काळ टिकूं शकला नाहीं. १४ व्या शतकांत मुसलमानांनीं मलाक्का हस्तगत केल्यापासून मलाया इस्लामकडे वळला. भारतांत हिन्दुधर्माची राजकीय पीछेहाट झाल्यामुळें मलायासारखीं हिन्दूंचीं केन्द्रें वर्चस्वाखालून निसटलीं. तरी आजतागायत मुसलमानधर्मी सुलतान व लोक यांच्या रीतिरिवाजांमध्यें व विधींमध्यें हिन्दुधर्माचे अवशेष दिसून येतात. मलाया थायलंडखेरीज इतर बाजूंनीं समुद्रांनीं वेढलेला असल्यानें दर्यावर्दी राष्ट्रांचें त्यावर वर्चस्व राहिलें. पंधराव्या शतकाच्या अखेरीस नौकानयन, होकायन्त्र वगैरे शास्त्रीय शोधांमुळें पोर्तुगाल, स्पेन, हॉलंड व इंग्लंड या राष्ट्रांनीं समुद्रावर स्वामित्व संपादन केलें व त्यामुळेंच त्यांचा दुनियेच्या कानाकोपऱ्यांत संचार होऊं लागला. इ. स. १५११ मध्यें मलाक्का पोर्तुगीजांनीं मुसलमानांकडून जिंकलें, तेंच डचांनीं इ. स. १६४१ त काबीज केलें व ब्रिटिशांनीं इ. स. १८२४ त डचांकडून हस्तगत केलें. एकोणीसाव्या शतकापर्यन्त मलाक्काखेरीज मलायाच्या अन्तर्गत प्रदेशांत पाश्चात्त्य देशांनीं शिरकाव केला नव्हता. भारतांत अठराव्या शतकाच्या शेवटास मार्क्विस ऑफ वेलस्लेनें देशी संस्थानांना पंखाखालीं घेण्या-( Subsidiary System )चें जें धोरण अवलंबिलें तेंच इ. स. १८७३ मध्यें ब्रिटिशांनीं मलायांत अंमलांत आणलें. १८९५ पर्यंत चार संस्थानें त्यांच्या आश्रयाखालीं आलीं; १९०९ मध्यें उरलेलीं सयामनें हवालीं केलीं.

### दोन स्वतंत्र राज्यें

आजचा राजकीय नकाशा जर निरीक्षिला तर मलायाचें संघराज्य व सिंगापुर अशीं दोन स्वतंत्र राज्यें ब्रिटिशांच्या आधिपत्याखालींच नांदत असलेलीं








दिसतात. ५०००० चौरस मैलांच्या मुलुखांत दोन राज्यें कशीं, आणि त्यांतले त्यांत मलायाच्या संघराज्यांत जशी संमिश्र लोकवस्ती आढळते तीच सिंगापुरमध्यें असतांना हे दोन स्वतंत्र घटक करण्याचें काय कारण ? — असा प्रश्न मनासमोर येतो. याचें कारण अंशतः इतिहासांत व अंशतः ब्रिटिशांच्या राजकीय डावपेचांत आढळून येतें. इ. स. १८२५ त मलाक्का हा मलायाचा एकच भाग ब्रिटिशांच्या ताब्यांत होता. त्या अगोदर एकच वर्ष म्हणजे इ. स. १८२४ मध्यें सिंगापुर बेट त्यांच्या संपूर्ण कब्ज्यांत आलें. इ. स. १८१९ मध्यें या जगप्रसिद्ध बंदराची मुहूतमेढ स्टॅम्फोर्ड रॅफल्स या ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यानें केली. डचांच्या ताब्यांत मलाक्का आल्यापासून मलाक्काचें दर्यावर्दी व्यापारी वहातुकीचें केन्द्र म्हणून पूर्वी जें महत्त्व होतें तें पार नाहींसें झालें, कारण डचांनीं व्यापाराचें व कारभाराचें केन्द्र म्हणून इन्डोनेशियांतील बटेव्हियाला मान्यता दिली. तेव्हांपासून मलायाचें दर्यावर्दी दळणवळणाच्या दृष्टीनें महत्त्व कमी झालें. डचांची आग्नेय व पूर्व आशियावरील व्यापारी मक्तेदारी नष्ट करावी या हेतूनें रॅफल्सनें सिंगापुरची स्थापना केली. जोहोरच्या सुलतानाकडून हिकमतीनें रॅफल्सनें सिंगापुर विकत घेतलें, त्यावेळीं तेथें दलदल होती आणि मलेरिया ' मी ' म्हणत होता. रॅफल्सला या धूर्तपणासाठीं फार जबर किंमत द्यावी लागली. मलेरियाला त्याची कुटुंबीय मंडळी बळी पडली, इतकेंच नव्हे तर ईस्ट इंडिया कंपनीचे चालक त्याच्यावर रुष्ट झाले. पण थोड्याच दिवसांत रॅफल्सनें दाखविलेल्या धूर्तपणाचीं फळें ब्रिटिशांना चाखावयास मिळालीं. सिंगापुर हें पूर्व आशियांतील व्यापाराचें केन्द्र बनलें. इ. स. १८२५ मध्यें सिंगापुरचा व्यापार २६ लक्ष पौंडांचा होता तर इ. स. १८६४ त तो १३२ लाख पौंडांपर्यंत वाढला. रॅफल्सनें सिंगापुर वसवलें तेव्हां तें कोणत्याहि राष्ट्राच्या व्यापाराला व नौकानयनाला तेथें मोकळीक राहील अशी त्यानें घोषणा केली. ( " trade open to ships and vessels of every nation free of duty, equally and alike to all " ). खुल्या व्यापाराची घोषणा करूनच ब्रिटिशांनीं एकोणीसाव्या शतकांत व्यापारी मक्तेदारी स्थापन केली. वेळ फिरेल तसें हें खुल्या व्यापाराचें धोरण त्यांनीं फिरविलें हें 'साम्राज्यान्तर्गत सवलतीं'च्या (Imperial Preference) तत्त्वाच्या जाणकारांना सांगणें नको. सिंगापुरमध्यें चिनी बहुसंख्य असल्यामुळें मलायन संघराज्यांतील बहुसंख्य मलायी लोकांना सिंगापुर संघराज्यांत मिळालें तर चिनी लोकांची बहुसंख्या होईल अशी भीति वाटते. सिंगापुरचे मुख्य प्रधान डेव्हिड मार्शल यांनीं सिंगापुरला मलायी संघराज्याशीं हातमिळवणी करण्याची इच्छा आहे असें मत नुकतेंच व्यक्त केलें. त्यावरून संघराज्यांतील मलायी लोकांच्या मनांतील भीति या एकीच्या आड येत आहे असें दिसतें. सिंगापुर स्वतंत्र ठेवण्यांत ब्रिटिशांचा व्यापारी सवलती उपटण्याचा हेतु आहे हें खरें. पण मलायी व सिंगापुरांतील जनतेतेच्या प्रतिनिधींनीं एकत्र यावें असें ठरवलें तर त्या निश्चयाच्या आड ब्रिटिश उभे ठाकतील असें वाटत नाहीं.

### पक्षसंघटना

मलायाची १९५४ सालापर्यंतची घटनात्मक प्रगति इतकी मंदगतीनें झाली होती कीं त्या हिशेबानें इतक्या लवकर मलायाला स्वायत्त सरकार मिळत आहे याविषयीं आश्चर्य वाटणें साहजिक आहे. परंतु दुसऱ्या महायुद्धानें आशियाच्या नकाशाचा रंगच पालटला हें खरें. दुसऱ्या महायुद्धापूर्वी मलायामध्यें लोकानीं निवडलेल्या प्रतिनिधींची अशी कसल्याच प्रकारची यंत्रणा नव्हती एवढें म्हटलें म्हणजे पुरें. संस्थानांच्या अधिपतींना ( सुलतानांना ) सल्लागारमंडळावर जागा दिली होती; सुलतानांच्या मुखावाटे काय जनमत व्यक्त येईल तेवढाच जनमताचा व ब्रिटिश सरकारचा संबंध होता. अर्थात् संस्थानांना स्वायत्तता होती, पण ही स्वायत्तता काय प्रकारची असेल याची भारतांतील संस्थानांवरून आपल्याला कल्पना येईलच. १९४६ त ब्रिटिशांनीं या संस्थानांना Union मध्यें एकत्र आणलें, पण हा प्रयोग अयशस्वी झाला. संस्थानांचें ' स्वातंत्र्य ' नष्ट झालें, मलायी धर्माची पायमल्ली झाली, अशा घोषणा सुलतानांनीं व लोकप्रतिनिधींनीं केल्या, म्हणून संघराज्य ( Union ) बारगळलें. १९४८ मध्यें सरकार, संस्थानिक व लोकप्रतिनिधी यांमध्यें नवीन करार झाला. ( Federa-








tion Agreement ). १९०९ सालीं भारतांत ज्या प्रकारचीं कायदेमण्डळें स्थापन झालीं तसलीं मलायांत या १९४८ च्या करारानुसार स्थापिलीं गेलीं. व्यापारी, औद्योगिक, जातीय व प्रादेशिक, सनदी नोकर अशा निरनिराळया हितसंबंधांना प्रतिनिधित्व दिलें आणि प्रथमच मुख्य सचिव ( Chief Secretary ) ॲडव्होकेट-जनरल व अर्थसचिव ( Financial Secretary ), यांखेरीज इतरांकडे खातीं सोपवण्यांत आलीं. १९४८ च्या निवडणुकीनें एक फायदा झाला आणि तो हा कीं कांहीं पक्ष संघटित झाले व त्यांपैकीं तीन पक्षांनीं एक फळी उभी करून जुलै १९५५ च्या निवडणुकींत जय मिळविला. १९५४ मध्यें महत्त्वाची घटनात्मक सुधारणा जाहीर करण्यांत आली. सर्व प्रौढ मतदारांना मतदानाचा हक्क देण्यांत आला व जनतेनें निवडलेल्या मंत्र्यांच्या हातीं बहुसंख्य खातीं सोपविण्याचा निर्णय ब्रिटिश सरकारनें घेतला. १९५५ च्या निवडणुकींत 'उम्नो' ( Umno ) 'युनायटेड मलायन नॅशनल ऑर्गनायझेशन )–एम्. सी. ए. ( Malayn Chinese Association )– एम् आय्. सी. ( Malayan Indian Congress ) या पक्षांनीं एकत्र येऊन इतर पक्षांविरुद्ध निवडणूक लढवली व ५२ पैकीं ५१ जागा जिंकल्या. या पक्षाला चिनी व हिन्दी लोकांचा पाठिंबा असल्यामुळेंच त्यानें निवडणूक जिंकली हें उघड होय. उम्नोचा नेता टेंग्कु अब्दुर्रहमान मुख्य प्रधान म्हणून निवडला गेला. तो व सुलतानांचे प्रतिनिधी यानीं गेल्या महिन्यांतील वाटाघाटींत भाग घेतला व त्यांना जें पाहिजें होतें तें त्यांना मिळालें.

## बाह्य संरक्षण व परराष्ट्रीय धोरण

१९४८ सालापासून चालू असलेलें साम्यवाद्यांचें गनिमी युद्ध अद्याप शमलें नाहीं, हेंच महत्त्वाचें कारण या घोषणेमागें आहे हें कोणींहि सांगू शकेल. ६५००० लष्करी सैन्य ( ब्रिटिश, गुरखा, ऑस्ट्रेलियन न्यूझीलँडर्स, फिजी, आफ्रिकन सैनिक असलेलें ), तितकेंच हत्यारी पोलिस व होमगार्ड यानीं जंगलाच्या घनदाट राईंतून बॉम्बवर्षाव करूनसुद्धां दहा हजाराच्या आंत असणारे साम्यवादी दहशतवादी सैनिक हरले नाहींत. यावरून त्यांना लोकांचा ( विशेषतः चिनी लोकांचा ) पाठिंबा असला पाहिजे हें स्पष्ट आहे. १९५० मध्यें ब्रिग्स या लष्करी हालचालीवरील मुख्य अधिकाऱ्यानें नवीन योजना आंखली. या गनिमी सैनिकांची अन्नाची व इतर आवश्यक रसद थांबवली तर ते नामोहरम होतील असा तर्क बांधून जंगलाच्या सरहद्दीवर जमीन लागवडीखालीं आणणाऱ्या उपऱ्या चिनी ( squatters ) लोकांच्या भोवतीं तारांचें कुंपण बांधून त्यांच्यावर सक्त देखरेख ठेवण्यास सुरुवात केली. मलायांतील ४०% चिनी लोकांचीनिदान त्यांतील गरीब व मध्यम वर्गीयांची सहानुभूति साम्यवादी चीनकडे असल्यामुळें गनिमी युद्धास त्यांचा मनांतून पाठिंबा असावा असें मानण्यांत येतें. मलायाची उत्तरेची सरहद्द सयामला भिडलेली आहे, आणि मलायांतील जंगल सयाममध्येंहि पसरलें आहे. गनिमी सैनिकांच्या हालचाली सयाममधून नियन्त्रित केल्या जातात, तेव्हां सयाममध्यें १०० मैल आंत लष्करी हालचाली करण्यास परवानगी द्यावी अशी विनंति मलायासरकारनें सयामला केली आहे असें समजतें. साम्यवादी नेता चिन-पेंग व टेंकु अब्दुर्रहमान यांमधील वाटाघाटी २९ डिसेंबर १९५५ ला फिसकटल्या, तेव्हां आतां मलायी स्वातंत्र्याच्या घोषणेनें दहशतवादी चळवळ मोडून टाकण्यांत लोकांचा पाठिंबा मिळेल असा ब्रि. सरकारला विश्वास वाटत असला पाहिजे. आणीबाणीची परिस्थिति असेपर्यंत बाह्य संरक्षण व परराष्ट्रीय धोरण ब्रि. सरकारच्या स्वाधीन रहाणार आहेत. ही तरतुद मलायी जनतेपैकीं कांहींजणांना रुचणार नाहीं अशी भीति 'मॅन्चेस्टर गार्डियन'नें सुद्धां व्यक्त केली आहे. पण मलायी लोकांना स्वायत्ततेची तेवढी किंमत आज देण्याशिवाय गत्यन्तर नव्हतें. पुढील वर्षी घटना जेव्हां बनविली जाईल तेव्हां मलाया-कॉमनवेल्थ यांचे संबंध कसे असतील हें निश्चित समजेल.

## नवजात लोकशाही

आशियांतील इतर नवजात लोकशाही राष्ट्रांप्रमाणेंच मलायामध्यें लोकशाही सुस्थिर होण्यास बराच अवधि लागेल. लष्करी हुकूमशाहीचा मार्ग सोपा असल्यामुळें तिचा धोका आशियांतील लोकशाहीस आहे. मलायांतील मलायी ( ४०% ), चिनी (४०%), हिन्दी ( ८% ) व इतर युरेशियन आदि संमिश्र

लोक यांमधून एक लोकशाही राष्ट्र कसें उभें करावयाचें हा फार मोठा प्रश्न आहे. त्यांतले त्यांत चिनी लोकांचे डोळे साम्यवादी चीनकडे असल्यामुळें त्यांची दृष्टि मलायावरच केंद्रित होण्यावर मलायाचें भवितव्य अवलंबून आहे. आतांपर्यंत संयुक्त राज्यांतील निम्मे चिनी व एकतृतीयांश हिंदी लोक यांना नागरिकत्वाचे हक्क बहाल करण्यांत आले आहेत. तेव्हां नागरिकत्वाचे हक्क दिल्याशिवाय ही जनता मलायाबद्दल आपुलकीची भावना बाळगणार नाहीं, हें उघड आहे. खालच्या व मध्यम वर्गांतील जनतेची आर्थिक व सामाजिक प्रगति केल्यानेंच मलायी सरकारविषयीं त्यांना सहानुभूति वाटेल हें तितकेंच खरें आहे. संसदीय लोकशाहीचा आत्मा खंबीर पक्षसंघटना ही होय. त्या दृष्टीनें मलायांतील उम्नो, एम्. सी. ए, नेगारा इत्यादि पक्ष प्रसिद्ध व्यक्तींभोवतीं गिरक्या खात असतांना दिसतात. लोकशाहीवर निष्ठा असणारे असे निरनिराळ्या सामाजिक, आर्थिक व राजकीय कार्यक्रमावर आधारलेले जातिनिरपेक्ष पक्ष अद्याप मलायांत स्थापन व्हावयाचे आहेत. नैसर्गिक रबराचें जागतिक बाजार-पेठेंतील महत्त्व निश्चिन्त रहाण्यावरहि मलायाची सुस्थिरता अवलंबून रहाणार आहे. इ. स. १८७७ मध्यें सर हेन्री विकहॅम यानीं ब्राझीलमधून रबर आणून त्याची मलायांत लागवड करीपर्यंत मलायाला आर्थिक महत्त्व आलें नव्हतें. कृत्रिम रबराचें उत्पादन सर्वत्र वाढत आहे. नैसर्गिक रबराचें उत्पादन जितकें कार्यक्षम व त्याची किंमत कृत्रिम रबराच्या मानानें जितकी कमी तेवढी त्याला मागणी जास्त रहाणार. मलायांतील दर माणसास ७५ पौंड वर्षास मिळतील एवढी रबरविक्री होते. ( R. Palme Dutt. 'The Crisis of Britain and the British Empire' p. 78 ). त्या दृष्टीनें आजच्या उत्पादनास धक्का न लावतां ब्रिटिश मक्तेदारांच्या हातांत असलेला हा धंद्याचा फायदा मलायी जनतेच्या सुधारणेखालीं कसा मिळवतां येईल हा एक प्रश्न मलायापुढें राहील. इराणमधील तेलधंद्याच्या राष्ट्रीयीकरणापासून योग्य तो बोध मलायाला घ्यावा लागेल. सिंगापुर संघराज्यांत आल्यास त्याला स्वायत्तता देऊं असें टेंकूनें जाहीर केलें आहे. सिंगापुरच्या स्वातंत्र्याचा प्रश्न येत्या एप्रिलमध्यें धसास लागणार आहे. सिंगापूर मलायी संघराज्यांत सामील होणार कां नाहीं हें तेव्हां कळेल.

---

## तं केवलानन्दयतिं नमामि ।

[ ब्रह्मीभूतकेवलानन्दचरणारविन्दानां प्रथमस्यां पुण्यतिथौ (१८-३-५६) अर्पितोऽयं आदराञ्जलिः ]

गुरोः पुरान्वेषपरेण येन
 भिक्षाशिनाधीतमिहैव वाय्याम् ।
यूनैकभार्यात्ववृता च विद्या
 तं केवलानन्दयतिं नमामि ॥

विद्या अवाप्य श्रुतपारगेभ्य-
 स्तपोबलं येन च वर्धयित्वा ।
प्रावर्ति विद्याश्रम आत्मशिष्यै-
 स्तं केवलानन्दयतिं नमामि ॥

शब्दः ससाहित्य उतेतिहासः
 श्रुतिस्मृती दर्शनषट्कमेषाम् ।
अभीक्ष्णपाठैर्ग्लपितस्वकण्ठं [1]
 तं केवलानन्दयतिं नमामि ॥

धर्मेतिहासं नवशास्त्रदृष्ट्या-
 -धीयान एवार्हति नेतृभावम् ।
अतो व्यधाद्यो नवधर्मकोशम्
 तं केवलानन्दयतिं नमामि ॥

लोके क्वचिच्छास्त्रविदो विरागाः
 क्वचिद्विरागो व्यवहारविच्च ।
युक्तः प्रधीराश्रमकृद् य आस-
 स्तं केवलानन्दयतिं नमामि ॥

ब्रह्माप्यये तिष्ठति को विशेषो
 मुक्तो भवत्यात्मसमप्रतीकम् ।
सर्वैर्विबुद्धैः समभावमेतम् [2]
 तं केवलानन्दयतिं नमामि ॥

— वा. गो. परांजपे

१ व्याकरण, साहित्य, इतिहास इत्यादींचे सतत पाठ देऊन ज्यांनीं आपला कंठ दुखवून घेतला.

२ ब्रह्मांत विलीन झाल्यावर स्वतःचें असें निराळें काय रहातें ? एक मुक्त आपणांसारख्या मुक्तांचें प्रतीक बनतो. अखिल आत्मज्ञान्यांशीं समभाव प्राप्त झालेल्या त्या केवलानन्दांना प्रणाम.



अनुक्रमणिका






प्रा. दि. के. बेडेकर

# कै० बाळ सीताराम मर्ढेकर

प्रतिभेचें व कर्तृत्वाचें वरदान ज्यांना लाभावें त्यांनाच अल्पायुष्य लाभावें असा आपल्या महाराष्ट्रभूमीला जणूं शाप दिसतो. त्यांतल्या त्यांत कलावंताच्या बाबतींत तर असें दुर्दैव दिसतें कीं, त्यांची झेंप सरळ, सहज, अल्पवयांतच अचानक मृत्यूच्या दाढेंतच पडते ! हा केवळ योगायोग आहे असें बुद्धीला वाटलें तरी मनाला तें समजत व उमजत नाहीं. ' असें कां व्हावें ? हा प्रश्न अंतःकरणाला व्याकुळ व विकल करतो. मर्ढेकरांचा मृत्यु ही अशीच एक विपरीत व अकल्पित घटना आहे.

' जगून थोडें अखेर मरणें<br>
उघडझांप ही डोळयांचीच<br>
अंधारांतुन राडाराचा<br>
किरण चालला सलत पुढेंच '

असें या बाबतींत स्वत: मर्ढेकरांनीं म्हटलें आहे. कडवटपणानें व बेदरकारपणानें मृत्यूकडे पहात खिन्नपणें हंसावयाचें व मानवी जीवनाच्या गूढ गहन अंधारांत काव्यप्रतिभेच्या राडार-किरणानें अर्थासाठीं चांचपडत रहावयाचें असा त्यांचा बाणा होता. त्यांच्या या चांचपडण्याला, या पिसेपणाला, कोणी अनाकलनीय ( व म्हणून अर्थहीन ) ठरविलें, पण त्यांनीं एकमार्गी व एकछंदी राहून आपलें व्रत चालूं ठेवलें. 'डोळयांची उघडझांप' बंद होईपर्यंत ते स्वतःशीं, कलेशीं, मराठी भाषेशीं व आपल्या सर्वांच्या जीवनांतील भल्याबुऱ्याशीं प्रामाणिक राहिले. त्यांच्या व्यक्तित्वाची महात्मता त्यांच्या या गाढ प्रामाणिकपणांत आहे.

## अनामिक भक्तिभाव

मर्ढेकरांच्या काव्याचें व त्यांच्या काव्यविषयक दृष्टीचें मोजमाप करण्यासाठीं आतां पुढचा सगळा काळ मोकळाच आहे. आज मोजमापाची मनःस्थिति कोणाची असेल ? आणि त्यांच्या विषयींचें मोजमाप गेलीं कित्येक वर्षें चालूं आहेच ! खरी गोष्ट तर अशी आहे कीं मर्ढेकरांनीं लिहिलेल्या काव्याचें व समीक्षेचें मोजमाप करावयाचें तर त्यांची विलक्षण दृष्टि स्वीकारावयास हवी.

' सुरांत भरली टिटवीच्या कुणी.<br>
मृत्युंजयता भोळी, भगवीं.'

अशा एका अनामिक भक्तिभावाची ही दृष्टि त्यांना लाभली होती. जुन्या काळच्या संतभागवतांना जशी परमेश्वरभक्तीची तहान लागली होती तशी जीवनांतल्या ' अजाणत्या आकाक्षांच्या ' गूढ ओढीनें त्यांचें हृदय भारावलेलें होतें.

त्यांचा हा भोळा, भगवा भक्तिभाव हळुवार होता म्हणूनच प्रतिष्ठितांच्या दंभावर व कर्मठपणावर त्यांनीं कठोरपणानें शस्त्र चालविलें. मानवतेच्या उद्धारासाठीं ख्रिस्त, बुद्ध किंवा गांधी यांच्यासारखे महात्मे बलिदान करतात पण त्यांच्या आहुतींचें निर्माल्य होतें – 'अन् इसवी सन कवायतीचा, कदम उचलुनी पुढें सरकला ' एवढेंच ' ऐतिहासिक ' घडतें ! या महात्म्यांच्यासाठीं ' अनंत उठले सुतकी शब्द ' असें भव्य कांहींतरी घडतें पण तें शेवटीं दंभाइतकें पोकळ ठरतें. मर्ढेकरांना या साऱ्या भीषणतेनें खरेखुरें खचविलें होतें. त्यांच्या मनांत मानवी जीवनाचें एक स्वप्नमंदिर केव्हांतरी रचलें गेलें होतें; पण त्याचा खांब नि खांब आजच्या नाठाळ व दांभिक जगाच्या विषारी आगीनें तडकून गेलेला होता.








## ' चिरंतनाचा पूत '

आपल्या मनांतलें भंगलेलें स्वप्नमंदिर तसेंच उराशीं बाळगून मर्ढेकरांनीं आपल्या प्रतिभेची ज्योत जळत ठेवली होती. यांतच त्यांच्या सामर्थ्याचें सार आहे व आपल्याला अनाकलनीय वाटणाऱ्या विफलतेचें मर्म आहे. केशवसुतांनीं जो स्वर्भूसंगम इहलोकीं, मानवतेच्या जीवनांत, 'साध्याहि विषयांत' पाहण्याचा अट्टाहास केला तोच संगम मर्ढेकरांच्या हृदयांत कोठेंतरी गुप्तरूपानें वसत होता. 'स्वर्गसमक्षता' पाहण्याची धडपड केशवसुतांप्रमाणेंच मर्ढेकरांची होती. बालकवींप्रमाणें फुलराणीच्या निरागस डोलण्यांत स्वर्गाचा साक्षात्कार होण्याचें भाग्य मर्ढेकरांना लाभलें नव्हतें म्हणा किंवा त्या साक्षात्कारांत गुंग होण्याइतकें ते निरागस राहिले नव्हते म्हणा ! त्यांच्या काळांत मानवी जीवनाचा प्रश्नच असा निरागस उरला नव्हता. पण, मर्ढेकरांच्या आत्म्याची ओढ व व्यथा त्या स्वर्गासाठींच होती, आणि म्हणूनच त्यांच्या कवितेंत उपरोधाचा इतका विस्तार आहे— आणि मधूनमधून मानवतेला 'चिरंतनाचा पूत' म्हणून आपुलकीनें हांक मारण्याइतका कोंवळा भक्तिभाव हि आहे !

मर्ढेकरांना नवकवितेच्या युगाचे प्रवर्तक म्हणून त्यांचा गौरव तर होत राहीलच; पण या गौरवांतहि 'उगीचता' येण्याचा धोका आहे. बिरुदें व संकेत, संप्रदाय व शिष्यशाखा यांचें शुभाशुभ मर्ढेकरांना नव्हतें. त्यांना फक्त कला हवी होती. ती काव्यरूप घेऊन येवो, रंगरूप घेऊन येवो किंवा आणखी कोठचें नवरूप घेऊन येवो. कलेचें वरदान हें माणसाला पशूपेक्षां वेगळें करणारें श्रेष्ठतम वरदान आहे, ह्या एका मंत्राच्या आधारानें त्यांनीं आपलें जीवन वेंचलें व लोकांसाठीं कांहीं लिहिलें. ही कलेची दृष्टि देतांना त्यांनीं मानवतेला एका परिपूर्ण स्वरूपांत पाहण्याची ईर्षा धरली – वेडी आशाच उराशीं बाळगली.

## कलात्मक दृष्टीची महात्मता

म्हणूनच त्यांच्या अकल्पित मृत्यूनें आपली सर्वांची एक विलक्षण, सहज न भरून येणारी हानि झाली आहे. आम्ही आतां नवकवितेला न बिचकण्याइतके तिचे रसिक तरी बनलों आहोंत किंवा खुपणाऱ्या नवकाव्यावर 'अनाकलनीयतेचें' संरक्षक पुट चढवून त्याचें आम्ही मोतीं बनवून टाकलें आहे ! जें कांहीं झालें असेल तें असो. पण, असेंहि केव्हांतरी खासच होईल कीं मर्ढेकरांच्या कलात्मक दृष्टीची महात्मता आम्हाला चांगली रसिकतेनें उमजेल. आमच्या डोळ्यावरचीं झांपडें दूर होऊन मानवी जीवन आणि त्याला कलेमुळें येणारी संपन्नता व सार्थकता आम्हाला स्पष्ट दिसूं लागेल. हें केव्हां व कसें होईल ? मर्ढेकरांच्या आशावादी शब्दांत सांगावयाचें तर:

— 'अशींच जावीं कांहीं वर्षें,<br>
आणि महात्मा यावा पुढचा<br>
अम्हांस आम्ही पुन्हा पहावें<br>
काढुनि चष्मा डोळ्यांवरचा.'

## मर्ढेकरांची बालसुलभ निरागसता

मर्ढेकर मराठी कवितेच्या आम्रवृक्षावरची खार होते. गाभुळलेलें फळ अचूक हेरण्याइतके चतुर होते. आपल्या नाजुक दांतांची त्याच्यावर कुसर करण्याइतके कुशल होते. आणि तिच्यासारखे वरच्या शाखेवर असूनहि बुजरे होते. रामा इतकाच सरस्वतीचा पुण्यपावन हात त्यांच्या पाठीवरून फिरला होता. खारीप्रमाणेंच त्यांनीं कांहीं क्षण धिटाईनें आमच्याकडे पाहिलें आणि अकस्मात् ते अदृश्य झाले !

— बा. भ. बोरकर

[ पुणें नभोवाणीवरील भाषणांतून (२०।३।५६) ]









अनुक्रमणिका

श्री. व. दि. कुलकर्णी

# केशवसुत आणि 'स्वर्गसमक्षता'

डिसें. १९५५ च्या 'नवभारता'च्या अंकांत प्रा. दि. के. बेडेकर यांनीं "केशवसुतांची 'स्वर्गसमक्षते'ची कल्पना" अत्यंत साक्षेपानें मांडली आहे. त्यांतील विचार मूलगामी आहे, परंतु तो जसाच्या तसा पूर्णपणें स्वीकारतां येईल असें वाटत नाहीं. त्यावर पुनः विचार होणें अगत्याचें आहे.

"केशवसुतांची कविता म्हणजे विविध सुट्या भावनांचा विस्कळितपणा नाहीं; कवीच्या विशिष्ट व्यक्तित्वाच्या एकसंधपणामुळें ह्या वरवर भासणाऱ्या विस्कळितपणांत एक परोक्ष परंतु प्राणभूत अशी रचना आहे." असें सांगून प्रा. बेडेकर म्हणतात कीं, 'ह्या रचनेचा शोध घेण्याच्या पद्धतीनें पहातां केशवसुतांच्या काव्यप्रतिभेला आणि आविष्काराला एक केंद्र आहे. तें केंद्र त्यांच्या 'स्वर्गसमक्षते'च्या विशिष्ट कल्पनेंत आहे." ह्या 'स्वर्गसमक्षते'च्या विशिष्ट कल्पनेचें स्पष्टीकरण ते पुढीलप्रमाणें देतात –"केशवसुतांना साध्या विषयांत नुसता 'मोठा आशय' दिसत नाहीं तर 'स्वर्ग'च दिसतो. हा स्वर्गहि नुसता काल्पनिक नाहीं, तर तो मनुष्यमात्रास 'समक्ष' असूं शकणारा स्वर्ग आहे...... आज जरी पृथ्वीवरील मनुष्यजीवन हें 'क्लिष्ट' असलें तरी तें वस्तुतः तसें असण्याचें कारण नाहीं. उलट पृथ्वीवरच नंदनवन निर्माण करण्याचें सामर्थ्य मानवी बुद्धींत व हृदयांत आहे, ही केशवसुतांची श्रद्धा आहे –'स्वर्ग' हा दुःखापासून पळून जाण्यासाठीं निर्माण केलेला कल्पनेचा गंधर्वलोक नसून मनुष्याला या जीवनांतच 'स्वर्गसमक्षता' लाभूं शकते अशी त्यांची प्रतिज्ञा आहे."

खरोखर केशवसुतांची अशी कांहीं 'प्रतिज्ञा' आहे असें आढळून येत नाहीं; आणि असल्यास त्यांची कविता ही दुर्घट प्रतिज्ञा पूर्ण करूं शकली नाहीं. प्रा. बेडेकरांनीं केलेलें 'स्वर्गसमक्षते'चें स्पष्टीकरण केशवसुतांच्या आशावादित्वावरच केवळ भिस्त ठेवल्यानें एकदेशीय, अपुरें आणि केशवसुतांच्या वाचकांना संदेहांत पाडणारें झालें आहे. केशवसुतांच्या कवितांच्या केंद्रस्थानीं 'स्वर्ग समक्ष होऊं शकतो' ही प्रतिज्ञा नसून स्वर्ग समक्ष 'व्हावा ही 'अनावर ओढ' आहे. प्रत्यक्षांतून झटकन् परोक्षाकडे वळणारे आणि अमूर्त आदर्शाचा वेध लागलेले केशवसुत त्यांच्या वाचकांना चिरपरिचित आहेत.हाच अमूर्त आदर्श 'स्वर्ग' ह्या नांवानें वारंवार त्यांच्या काव्यांत गौरविला जातो; पण हा 'स्वर्ग' प्रत्यक्षांत अवतरेलच अवतरेल असा निःसंदेह आत्मविश्वास केशवसुतांची कविता वाचकांमध्यें निर्माण करूं शकत नाहीं. प्रा. बेडेकर पुढें लिहितात कीं 'समृद्धि आणि प्रीति' यासारख्या साधारण कवितांतूनहि ही 'समक्षता' प्रत्यक्ष कृतीनें साधण्याची पौरुषपूर्ण वृत्ति ओसंडतांना दिसतो. म्हणजे असामान्य कवितांतून ही पौरुषपूर्ण वृत्ति ओसंडतेच ओसंडतें असा याचा ध्वन्यर्थ आहे. खरोखर, 'समग्र केशवसुत' अनुभविल्यावर वाचकाची वृत्ति अशा दुर्दम्य आशावादानें, पौरुषपूर्ण वृत्तीनें फुलून जाते का ? स्वर्भूसंगमाच्या आगामी दर्शनाच्या निश्चितीनें केशवसुतांची कविता केव्हांतरी नखशिखान्त पुलकित झालेली दिसून येते का ? 'संपूर्ण केशवसुत' वाचून पुस्तक खालीं ठेवतांना मन अधिकच अंतर्मुख, विचारमग्न आणि भावसंकुल होतें. विराट् शोकांतिकेचा अनुभव घेतल्यासारखा कांहीं तरी उदात्तरमणीय पण नैराश्यपीडित आनंद साऱ्या चेतोवृत्ती व्यापून टाकतो.

केशवसुतांची कविता दुःखानुगामी नाहीं, पण 'खंती'विना लाभणाऱ्या निरागस आनंदाचें विशुद्ध दान करणारीहि नाहीं. तेजाचा स्पर्श ती घडविते, पण ती सर्वांगीं तेजःपुंज झालेली नाहीं. 'तम अल्पद्युति, बहु' याचा प्रत्यय तिला होतो, पण तो क्षणजीवी, परिस्थितिसापेक्ष आहे. मानवी मनाच्या अमर्याद आकांक्षा तिनें बोलून दाखविल्या आहेत पण वास्तवांत त्यांना पडणाऱ्या मर्यादा तिला लपवितां आल्या












नाहींत. स्वर्ग हा पृथ्वीचा आदर्श आहे याचा वारंवार उच्चार करूनहि या भिकार जगांत इच्छित कांहीं मिळत नाहीं, हें कटु सत्य नाइलाजानें तिला कबूल करावें लागलें आहे. केशवसुतांच्या कवितेला ' स्वर्ग-समक्षते'चें स्तोत्र म्हणण्यापेक्षां स्वर्ग आणि पृथ्वी यांच्या मुग्ध, विद्ध प्रेमभावनेची करुण कहाणी म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल. 'स्वर्ग, पृथ्वी आणि मनुष्य' ही कविता, मला तर, केशवसुतांच्या कवितांच्या ' उगमीं विलयीं ' भरून उरल्यासारखी वाटते. ' स्वर्गनाश आणि स्वर्गाच्या पुनःप्राप्तीचें वेड ' ( Paradise Lost and Paradise to be regained ) हींच तीं उगम आणि विलयस्थानें होत. एकेकाळीं परस्परानुरक्त असलेलीं स्वर्ग आणि पृथ्वी यांची बेदिक्कतपणें ताटातूट करणाऱ्या कृतघ्न मानवाचा केशवसुतांनीं धिक्कार केला आहे. पश्चात्तापी मानवाला हें स्वर्भूमीलन परत घडवावयाचें असेल, गतशतकांचीं घोर पातकें क्षालावयाचीं असतील, तर आपल्या रुधिराचें दान करणें आवश्यक आहे असें ते स्पष्ट बजावतात. पण ह्या स्वार्थी आणि भावनाशून्य जगाला ह्या ' अमर्यादा 'चा ध्यास लागलेला नाहीं. फार काय कवीनें आपला बलि देऊन पृथ्वीसाठीं मिळविलेल्या ' दिव्य ठिणगी 'चा हें मठ्ठ जग सहज धिक्कार करूं शकतें, हें पाहून कवीला तीव्र विषाद होतो. या जगांत ज्याला चिकटून रहावें असें काय आहे ? – असा प्रश्न त्याच्यापुढें पडतो. ' आनंदाविषयीं बुरसटलेली अन्हेर-वृत्ति ' नसली तरी आनंदोत्सवांत उत्फुल्ल मनानें तो समरसूं शकत नाहीं. एकांतांत वेडेंवांकुडें वाद्य वाजवून स्वच्छंद गायनांत दंग होणें त्याला आवडतें. तेथेंच त्याचा आत्म्याशीं खरा हृदयसंवाद सुरू होतो. जड जगांत स्वर्गीय, कोमल, अतिशुद्ध भावना जीव धरूं शकत नाहींत याचा प्रत्यय त्याला पदोपदीं येत रहातो.

केशवसुतांनीं स्वर्गाला उद्देशून एकहि कविता लिहिली नसली तरी त्यांना स्वर्ग कुठें कुठें भेटे हें सहज समजण्यासारखें आहे. मातेच्या प्रेमळ नेत्रांत, मातामहांच्या पावक आशीर्वचनांत, आप्तस्वकीयांच्या निरपेक्ष त्यागांत, ऋषि-मुनींच्या तेजस्वितेंत, सतीच्या आत्मबलिदानांत, निद्रामग्न मुग्धेच्या मुखमंडलांत, शुभमुखीनें रेखलेल्या आदित्यादि रंगावलींत, माहेरच्या मुक्ततेंत, मुग्ध-मधु बाल्यांत, प्रज्ञा आणि प्रतिभा यांच्या दिव्य विलासांत, सतारीच्या दिड्दा-दिड्दांत केशवसुतांना स्वर्ग भेटे. निसर्गाच्या अढळ सौंदर्यांत, पक्ष्यांच्या मधुर कूजनांत, झुडपांवरील पुष्पांच्या हास्यांत, स्वच्छंद फुलपाखरांच्या भ्रमंतींत, ओढे-वनराजींच्या सान्निध्यांत, नदीतीरावरील एकांतांत त्यांना कांहीं अलौकिक, दिव्य भासे. केशवसुतांचें खरेंखुरें आवडतें जग हें आहे. हवेंत मुक्तपणें तरंगणारी ' म्हातारी ' आणि झरोक्यांतून पडलेल्या किरणांत प्रकाशमय झालेला मुक्त ' अणु ' हीं त्यांना या नावडत्या जड जगांतून चटकन् आपल्या आवडत्या विश्वांत नेत असत. ह्या विश्वाशीं केशवसुतांचें मन ' भावैकरस ' होत असे. यांत अढळ सौंदर्याची ओढ आहे, शैशवाच्या अनुभूतीनें पुलकित होण्याची वृत्ति आहे, आंतरिक महात्मतेपुढें अवनम्र होण्याचा सहजधर्म आहे. तेजाचें मनोभावें पूजन आहे, उपचारासाठीं सौजन्याचा बाह्यात्कारी स्वीकार करणारें हें जग नाहीं. सरळ हृदयाच्या आणि निर्मळ मनाच्या ह्या विश्वाला प्रौढ मानवाचा स्वार्थी वारा लागतांच केशवसुतांना परम खेद होई. जेथें साधेपण, शुचिता, शांति आहे; मधुरता, कोमलता, सुंदरता आहे; प्रीति, पावित्र्य आणि मांगल्य आहे,–तेथें स्वर्ग आहे, तें सारें अमर आहे, चिरतरुण, चिररुचिर आहे अशी केशवसुतांची भावना आहे. त्यांच्या स्वर्गांत क्षुधा आणि काम या प्रमाथी वासना धर्माला अविरोधी राहून सुफलित होतात. आहारनिद्रादींच्या आवर्तांतून सुटून गेल्यानें आणि कला व शास्त्र यांचे उपासक बनल्यानें तेथें सदैव नूतन व सुंदर निर्मिति चालू असते. ह्या स्वर्गांत 'खंतीविना आनंद ' आहे. नष्ट होणाऱ्या दिव्याभासांना पाहून 'कांहीं सुंदर देखिलें खचित मी, यामाजि शंका नसे' अशी हळहळ नाहीं उलट, 'कांहीं सुंदर देखितों सतत मी, यामाजि शंका नसे' असा चिरंतन अनुभव आहे. केशवसुतांच्या ध्यानीं-मनीं हा स्वर्ग जागा असतो.

या दिव्य वस्तूंच्या सान्निध्यांत केशवसुतांना आनंदाचा उमाळा येई, पण लगेच त्याहूनहि तीव्र दुःख होई. वनश्रींतून चाललेला फुलपांखराचा निर्बंध, स्वच्छंद संचार पाहून उद्यांच्या विवंचनेंत कंठाव्या लागणाऱ्या स्वतःच्या जिण्याची आठवण त्यांना होते; आणि आत्महीनतेच्या जाणिवेनें ( Negative







self-feeling नें ) ते विकल ( Paralysed ) होतात. ' म्हातारी'ला पहातांच त्यांना स्वतःच्या वयस्कतेची खंत वाटते; ते ' आजच्या चिंतांची व लटक्या हंसण्याची ' आठवण टाळूं पहातात. भुंग्याचा गुंजारव म्हणजेच सृष्टीचें खरें गान असून स्वतःचें गान हें त्यापुढें केवळ ' चिंध्यादान ' आहे, असें त्यांना वाटे. भृंगाची परमानंदपरिपूर्ण वृत्ति पाहून ' अस्मदीय हृदयीं ठरलें, कीं जग हें दुःखें भरलें ' हे उद्‍गार त्यांच्या मुखावाटे तत्काळ बाहेर पडतात. फुलाला पाहतांच तें घेण्यासाठी ते हात पुढें करतात, पण त्याला कंप सुटतो. दिव्यत्वाला स्पर्श करावयास त्यांना भय वाटूं लागतें. पूर्वीची त्याच्याशीं असलेली समता आठवून ' गेला गेला काळ अहह तो ! -- फेर किती आतां ' असा शोक सुरूं होतो. फुलाचा सहवास बरा अशी इच्छा ते बोलून दाखवितात. पण एका बाजूला सदैव सुंदर व तरुण असें पुष्पाचें हास्य आणि दुसऱ्या बाजूला मृत आशांच्या चितांवरून अशांतपणें भटकणारें स्वतःचें पिशाच पाहून निदान स्वप्नसृष्टींत तरी पुष्पसहवासाची इच्छापूर्ति होवो अशी ते करुणा भाकतात. ' फुलांची पखरण ' या कवितेच्या प्रारंभीचें पुण्यमय प्रभातकाळाचें वर्णन कवीनें किती मुक्तमनानें व आनंदानें केलें आहे ! पण हा आनंद फार काळ टिकणार नाहीं या भयानें

' असे जोंवर बहर, तोंवरी, टिप् फुलें टिप् '

अशी घाई ते करूं लागतात. सकाळ संपून ऊन तापलें आणि गद्य जगाचे धंदे सुरू झाले कीं फुलें विसरलीं जाणार ही तापद जाणीव त्यांना सतावते. यौवनानें जिच्या कौमार्याचा अंत केला नाहीं, अशी १२-१३ वर्षांची निद्रामग्न मुलगी पाहून तिच्या मुखावर स्वर्गीय भाव उमटलेले त्यांना दिसतात. ब्रह्मानंदनिमग्न लयींत ती समाधिस्थ झाली होती तिच्या कोमल गालाचा वात्सल्यानें पापा घ्यावा असें कवीला वाटतें. पण ह्या निष्पाप आनंदापासून त्याला परावृत्त व्हावें लागतें. ह्या स्वर्गीय भावनां ( Heavenly promptings of the heart ) च्या आड दोन गोष्टी येतात. एक म्हणजे दुसऱ्या मनुष्याचें अस्तित्व. आणि दुसरी म्हणजे सानंद सुषुप्तीच्या नाशाचें भय. रूढ नीति ही यथ स्वर्गीय भावनांना विरोध करतांना दिसते आणि ' जागृति ' ही आनंदनाश ओढवील ही भीति प्रगट होते. या अनिश्चित जगांत ह्या बालिकेची काय दशा होईल या विचारानें ते शोकाकुल होतात. आज तिच्या गालावर जें अजाणतेपण शोभत आहे, तेथेंच पुढें कटु जाणतेपण नांगर ओढणार आहे, आणि कालांतरानें तिच्या मुखावर आजच्या प्रमाणेंच मधुर चेतोवृत्तींचें समप्रमाण दिसणार नाहीं -- हा विचार कवीला विषण्ण करतो. केशवसुतांच्या कवितेंत सुंदरतेला अशीं कुसें लागलेलीं आहेत; आत्यंतिक आनंदाला दुःखाचा पदर लगटला आहे, प्रकाश अंधाराची सोबत सोडूं शकत नाहीं. "खंतीविना निरागस आनंद देणारा स्वर्ग' त्रिखंड हिंडूनहि सांपडत नाहीं, माझा असून मला तो कां लाभत नाहीं " ? यामुळें व्याकुळ झालेलें कविहृदय दृष्टीस पडतें. 'हरपलें श्रेय -- या गीताचें नातें आदर्शावस्थेच्या - स्वर्गाच्या - चिंतनाशीं आहे हें खरें, पण त्यांत आर्त नैराश्य, ' जीव पाखडणें ' आहे; ' स्वर्गसमक्षता ' घडली तर प्रेमानें प्राणाहुति द्यावयाची सिद्धता आहे; पण ती घडत नाहीं.

हा हातचा स्वर्ग कोणीं हिरावून नेला ? ' प्रौढपण ' हा ह्या स्वर्गाचा खरा मारेकरी आहे. मुलानें मोठें होणें हा त्याचा अपराध आहे असा याचा अर्थ नाहीं. जें हवें आहे तें

' **प्रौढत्वीं निजशैशवास जपणें**, '

हें आहे. हा कवीचा बाणा आहे. ' कोठें स्वर्गसमक्षता प्रगटते ' तें ह्या प्रौढत्वीं जपलेल्या शैशवानें प्रत्ययास येतें. ही बालपणाची जपणूक महात्मे मोठेंपणींहि करतात म्हणूनच ते महात्मे ठरतात. सज्जन हे सृष्टीचे स्वयंभू नियम पाळतात; पण ' लौकिक मूर्ख ' ' अशुद्ध स्वार्थानें ' प्रेरित होऊन ते नियम सुधारूं लागतात. धर्म आणि नीति यांमधील उद्धारक शक्तीचा नाश रूढि करूं लागते. स्वर्गावर प्रेम करणाऱ्या केशवसुतांचें ह्या व्यवहारी, उदरंभरू गद्य जगाशीं हाडवैर आहे. कठिण शब्दांच्या धोंड्यांनी ते हाणाहाण करीत सुटतात; डोंगरीचे द्वाड आडदांड बनतात. आळशी खुशालचंद, आपल्याच तोऱ्यांत बडबडणारे, मुलाम्याचें जिणें जगणारे, थप्पड बसतांच गाल चोळणारे, बालांस गरिबी शिकविणारे, वैऱ्याच्या पायधुळींत लोळून प्राप्त तूपपोळींत कृतार्थ होणारे, पैशासाठीं न्याय टाकणारे, दांभिकतेनें नटणारे, 'मी' -- चा संकुचित अर्थ करून अनर्थ माजविणारे, ह्यांवर

आणि ह्यांच्यासारख्यांच्यावर केशवसुत घाव घालीत सुटतात. ' स्वर्ग, पृथ्वी आणि मनुष्य ' ह्या कवितेंत निर्देशिलेल्या कृतघ्न मानवाचीं हीं निर्लज्ज संतानें होत. वसुंधरेचें यौवन, धन यांनीं लुटलें; तिला वृद्ध, गरीब बनविलें. स्वर्गावर प्रेम करणारी आणि त्याच्या प्रेमास पात्र झालेली ही रूपमती, वसुमती पृथ्वी ह्या कृतघ्नांच्या तावडींत सांपडतांच कुरूप, करंटी बनली. स्वर्ग तिला कायमचा अंतरला. केशवसुतांची कविता ही ह्या गंधवतीच्या अंतरींचे दुःखाचे कढ आहेत, ती एक विशाल विह्वल प्रेमकथा आहे, असें यामुळें वाटतें.

केशवसुतांचा स्वर्गसमक्षतेचा अनुभव सर्वस्वीं आत्मनिष्ठ होता, आणि तोहि ओझरता, क्षणा-दोन-क्षणाचा, हुलकावणी देत जाणारा. ह्या अनुभवानें केशवसुतांना नैराश्याचे धनी बनविलें. हें नैराश्य उदात्त आहे. संत, महात्मे यांना आपल्या आध्यात्मिक जीवनांत ह्याचा अनुभव कांहीं काळ यावाच लागतो. अमर्यादाला कवटाळतां न आल्यानें येणारें हें नैराश्य मर्यादित अशा जगांतील उच्चतम यशाहूनहि वरच्या पातळीवरचें आहे. प्रतिभावंतांची अहंता केशवसुतांच्या ठायीं इतकी आहे कीं तें हें नैराश्य पचवूं शकतात. दैवी गुणांवरील त्यांची निष्ठा कधीं ढळत नाहीं. त्यांची कविता स्वतःच्या दैनंदिन जीवनांतील लौकिक हर्षामर्षांत कधींच गुरफटत नाहीं. केशवसुतांच्या कवितेचें मोठेपण यांत आहे कीं ती अथपासून इतिपर्यंत दैवी गुणांची पूजक आहे. ही पूजा सुफलित होवो न होवो. त्यांची कविता स्वतःची उच्च बैठक ढळूं देत नाहीं. ती दैववादी नाहीं कीं स्त्रैणहि नाहीं. ती आत्मकेंद्रित नाहीं, तर आत्मनिष्ठ आहे. ह्या आत्मनिष्ठेला सामाजिक नेत्र लाभले आहेत; कधीं कधीं हे नेत्र अखिल विश्वावर खिळून रहातात आणि मग आपल्यामध्येंच विश्व पाहून विश्वाची पूजा आरंभिली जाते. अशा क्षणीं विषाद आणि खेद लुप्त होतात. पद्यपंक्तीच्या तरफेची शक्ति, कलावंतांचें कलासौंदर्य आणि शास्त्रज्ञांचें बुद्धिसामर्थ्य यांचा बडिवार ते तडफेनें गाऊं लागतात. स्वतः ' स्वत्वाचे चोर ' बनून ' सत्त्वाचा उदयोऽस्तु ' असें ललकारत ' शांतीचें साम्राज्य ' स्थापण्याचा उद्घोष करतात. 'धीराला दे प्रसंग हिंमत' हें जाणून आणि ' जग हें बदलायाचें ' याची खात्री बाळगून ते सत्य, सच्छील, ज्ञान आणि उद्यम यांची कास न सोडण्याची, उत्तेजनाची भाषा बोलतात. ' तुतारी, ' ' स्फूर्ति, ' आम्ही कोण,' ? ' मूर्तिभंजन' आणि ' गोफण ' या त्यांच्या कविता अंतर्बाह्य ओजस्वी आहेत. कसलेंहि भय किंवा कोणताहि खेद ह्या कवितांना स्पर्श करूं शकलेला नाहीं. स्वर्गाचा सत्यानाश करणाऱ्या नीच मानवांवर तुटून पडणाऱ्या ह्या कवितांची जात तुकारामाच्या दंभपरिस्फोटक अभंगांच्या जातीची आहे. फूल, फूलपांखरूं, शैशव यांचें चिंतन, पूजन, आणि जतन ज्यासाठीं करावयाचें त्यासाठींच ह्या स्वार्थी, पोटभरू, अनुदार जगाशीं वैर धरावयाचें. दिव्यतेच्या सान्निध्यांत स्वाभाविकपणें जागी होणारी आत्महीनतेची भावना आणि कृतघ्न जगाच्या दर्शनानें उफाळून येणारा त्वेष-संताप या दोन्हींच्याहि मुळाशीं केशवसुतांचें ' स्वर्गप्रेम'च आहे. त्याचा सामाजिक आविष्कार आक्रमक आणि बराच भंजनात्मक आहे. आणि व्यक्तिगत आविष्कार mystic आहे. ह्या अंतर्बाह्य दृष्टीमुळें केशवसुतांची कविता ऐहिकतेचा जाच सोसूनहि ' स्वर्गीय , गुणांची पूजा करीत राहिली; ती स्वप्नरंजनांत रंगली नाहीं. केशवसुत स्वप्नाळु असते तर ह्या गद्यजगाच्या जहरानें त्यांना मृत्यूची ओढ लागली असती. केशवसुतांच्या कवितेंत आत्मघातकी वृत्ति ( Suicidal tendency ) दिसून येत नाहीं; क्वचित् दुःखप्रभव शरीराचा त्याग किंवा चिरसुप्ति-निःस्वप्न दीर्घ निद्रा यांचा मोह झाल्याचें दिसतें. पण तो मोह जगाविषयींच्या तीव्रतम कडवटपणाचा परिणाम म्हणून नव्हे. तसेंच केशवसुत जड जगाला तुच्छ लेखीत असले तरी त्या जगाची त्यांना किळस आल्याचें प्रत्ययास येत नाहीं. ' नरच केला हीन किती नर ' यांत चीड आहे, घृणा नाहीं. मानवाच्या चांगुलपणावर व सामर्थ्यावर त्यांचा उदंड विश्वास आहे. ऋषि-मुनि, द्रष्टे कवि हे त्यांचे सर्वश्रेष्ठ मानव आहेत. ह्यांचें तेज आणि तपस्या हीं पृथ्वीला सुरलोकसाम्य मिळवून देण्यास झटत आहेत' ही केशवसुतांच्या कवितेची धारणा आहे. केशवसुतांच्या कवितेंतील नैराश्यामागें हें देदीप्यमान प्रभामंडल आहे.

केशवसुतांचा ' नवा शिपाई ' समता आणि विश्वबंधुत्व हीं महातत्त्वें मोठ्या हिरिरीनें मांडतो. पण हीं तत्त्वें मानवसमाजाच्या दर्शनानें त्यांच्या हृदयांत उत्स्फूर्त








झालेलीं नाहींत. ' निसर्ग, फुलें आणि मुलें ' यांच्याकडे दृष्टि वळतांच ह्या भावनांना न कळत जाग आली आहे.

' जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत.
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत ' — कारण :

' सावलींत गोजिरीं मुलें
उन्हांत दिसतीं गोड फुलें
बघतां मन हर्पून डुले '

'तीं माझीं, मी त्यांचा–एकच ओघ अम्हांतुनि वाहे!' ही केशवसुतांची प्रतीति आहे. केशवसुत स्वर्ग न्याहाळतात तो या पृथ्वीच्या निष्पाप रूपांत, प्रौढ मानवाच्या विश्वांत नव्हे. त्यांची ' एक खेडें ' ही एकच एक कविता अशी आहे कीं जीमध्यें विशुद्ध आनंद आणि असूयाविहीन आत्मसंतुष्टता प्रगट झालीं आहेत. प्रेम कीर्ति, सत्ता, संपत्ति यांच्या मागें धांवत सुटलेल्या मानवजातीला अखेर काय हवें आहे, याचा पुनःपुनः विचार करावयास लावणारी ती कविता आहे. शाश्वत शांति आणि अक्षय आनंद हाच मानवाच्या साऱ्या धडपडीचा अंतिम हेतु आहे. ह्यालाच केशवसुत ' स्वर्ग ' असें संबोधतात. स्वर्गावर दृष्टि खिळलेल्या पण पृथ्वीवर पावलें टाकीत असलेल्या ह्या कवीला मधून मधून दिव्य भास होतात. ते चिरंजीव कां होत नाहींत ? ' अजाणतेपण'चा स्वर्ग जाणतेपणीं हातीं कां येत नाहीं ? तो केव्हां येणार ? ' माझें मज लाभेल कधीं ? ' या निराशागर्भ अनिश्चिततेंतच केशवसुत वावरतांना दिसतात. अखेर ' माणसांचें जग ' सोडून ते अनाथांचा वाली जवळ करतात. चिंता, भय, दुःखें अवघीं दूर झालीं असतांनाहि ' हें जग भिकार आहे, इथें इच्छित कांहींहि मिळत नाहीं ' ही हृदयाची व्यथा ठणकत आहेच. दीननाथाच्या चरणीं ' अलौकिक, दिव्य, अमर्याद, स्वर्गीय' या लाडक्या विशेषणांनीं जें गौरविलें त्याची भिक्षा मागतांना जेव्हां केशवसुत दिसतात तेव्हां हृदय जागच्या जागीं थबकतें. केशवसुताच्या ' स्वर्गसमक्षते'च्या अनावर आतुरतेचें हें अंत्यदर्शन माझ्या मनश्चक्षूंपुढें युगायुगांतून चालत आलेल्या महात्म्यांच्या दिव्य जीवनाची शोकांतिका उभी करतें.

प्रा. दि. के. बेडेकर यांच्या लेखानें केशवसुतांच्या कवितेचा एका अगदीं वेगळ्या दृष्टीनें पुनरास्वाद घडला, याबद्दल मी प्रा. बेडेकर यांचा अत्यंत ऋणी आहे.

---

सौ. कुसुम नारगोलकर

# अण्णांच्या कांहीं आठवणी

साधारणपणें मी सहासात वर्षांची झालें तेव्हांपासून गेल्या पंचवीस वर्षांतील माझ्या आठवणींतील माझे वडील म्हणजे पुस्तकांच्या कपाटांनीं भरलेल्या तीन खणांच्या माडींत वाचनांत गुंग असणारे आणि स्वतःच्या विचारांत गढून गेल्यामुळें स्नानादि नित्यकर्मे करीत असतांहि, मनांत उसळणारे विचार कोणी भेटावयास आला कीं त्याच्याजवळ खड्या आवाजांत व अभिनिवेशानें व्यक्त करणारे, असे अण्णा माझ्यासमोर उभे रहातात. अण्णांना मोठ्यानें वाचण्याची संवय होती. नाट्यदिग्दर्शकाचा व्यवसाय केला असल्यामुळें त्यांच्या वाचनांतहि नेहमीं अर्थानुकूल चढउतार असे. कित्येकदां त्यांच्याकडे कुणीतरी आलेलें आहे व त्यांच्याशीं ते बोलत आहेत असेंच वाटे.

सेवानिवृत्तीनंतर अण्णांना नाट्यक्षेत्रांतल्या कुणी हौशी तरुण मंडळीनीं बोलाविलें तर ते दिग्दर्शनासाठीं जात असत. मुंबईचीं मेडिकल् कॉलेजेस् व पुण्याचें सर परशुरामभाऊ कॉलेज् येथील विद्यार्थिसंघ बरेच वेळां त्यांना मार्गदर्शनासाठीं बोलावीत असत.

---

**श्री. त्र्यं. सी. ऊर्फ अण्णासाहेब कारखानीस** हे ८ जानेवारी १९५६ रोजीं दिवंगत झाले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें विविध दर्शन करून देणारे कांहीं लेख व आठवणी ' नवभारता'च्या गेल्या फेब्रुवारी १९५६ च्या अंकांत प्रसिद्ध झाल्याच आहेत. — प्रस्तुत स्थळीं कै. अण्णासाहेबांची कन्या सौ. कुसुम नारगोलकर यांनीं त्यांच्या कांहीं जिव्हाळ्याच्या आठवणी दिल्या आहेत. — का. सं.








एका वर्षी एका कॉलेजमधील विद्यार्थ्यांच्या विनंतीवरून विद्यार्थी बसवीत असलेल्या नाटकाच्या दिग्दर्शनासाठीं अण्णा जाऊं लागले. एकदां तालमीच्या जागीं ठरलेल्या वेळेवर एकहि विद्यार्थी हजर नव्हता. अण्णा तेथें गेले व न थांबतां व कांहीं न बोलतां मुकाट्यानें परत चालूं लागले. ही गोष्ट त्या कॉलेज्च्या प्रिन्सिपॉल्ना समजली. त्याबरोबर ते अण्णांच्या मागाहून धांवतच आले व त्यांनीं विद्यार्थ्यांच्या वतीनें अण्णांची क्षमा मागितली व दुसऱ्या दिवसापासून विद्यार्थी वेळेवर हजर राहतील याची हमी घेतली, तेव्हां अण्णांनीं दिग्दर्शन चालूं ठेवण्याचें मान्य केलें.

१९२० च्या पूर्वीची गोष्ट. महाराष्ट्र–नाटक–मंडळीचा मुक्काम एका मोठ्या संस्थानांत होता. त्या काळीं संस्थानिकांचा मान व दरारा मोठा असे. कंपनी त्या संस्थानच्या राजधानींत गेल्यानंतर रिवाजाप्रमाणें अण्णा राजेसाहेबांना नाटकास बोलवावयास गेले. राजेसाहेब शरीरानें बरेच उंच व धिप्पाड होते. अण्णा एकटेच बोलवावयास गेले होते. नमस्कार–चमत्कार व प्राथमिक बोलणें झाल्यानंतर अण्णा म्हणाले :

"बरं आहे, मग आज रात्रीं आपण आमच्या नाटकास यावयाचं."

"आम्ही तर येऊंच, पण आमच्याबरोबर आमचीं दोन पात्रें येतील. त्यांचीहि सोय होईल ना ?" महाराज हंसत हंसत म्हणाले.

"तें शक्य नाहीं !" अण्णांच्या तोंडून तत्काळ उत्तर बाहेर पडलें.

राजेसाहेब एकदम चपापले व रागानें अण्णांकडे पाहूं लागले. क्रोधयुक्त आश्चर्य त्यांच्या डोळ्यांत होतें. अण्णांना त्यांच्या त्या मुद्रेची क्षणभर भीति वाटली. पण त्यांनीं आपलें म्हणणें बदललें नाहीं. मुकाट्यानें ते तेथून मुक्कामीं परतले.

रात्रीं महाराज एकटेच नाटकास आले होते !

अण्णा महाराष्ट्र-नाटक-मंडळी चालवीत असतांना कित्येकदां आई, भाई, बापू वगैरे मंडळी कंपनीबरोबरच गांवोगांवीं फिरतीवर असत. भाई व बापू हे माझे वडील भाऊ. त्यावेळीं ते लहान होते. त्यांचा कंपनींतील सर्व मंडळींबरोबर चांगला परिचय होता. पण त्यांना किंवा घरच्या इतरहि कुणा नातेवाईक मंडळींना वाटल त्यावेळीं नाटकास किंवा तालमीच्या जागीं जातां येत नसे. दर रविवारीं घरच्या मंडळींना अण्णा नाटकाला बोलावीत.

कंपनीबरोबर बाहेरगांवीं मुक्काम असतांनासुद्धां कंपनींतील कोणतीहि वस्तु घरांत वापरावयाची नाहीं असा अण्णांचा कटाक्ष असे.

नागपूर-कॉंग्रेसहून अण्णा परत आले, त्यावेळीं भाई व बापू अंगणांत खेळत होते. टांग्यांतून उतरतांच अण्णा पुरते घरांतहि आले नाहींत आणि म्हणाले, "आतां तुमचीं दोघांचीं नांवें न्यू इंग्लिश स्कूलमधून काढावयाचीं, आणि राष्ट्रीय शाळेंत घालावयाचीं. लगेच त्यांच्या शिक्षकांना अण्णांनीं चिठ्ठी लिहून दिली.

अण्णांचा प्रयत्नवादावर फार विश्वास होता. इच्छाशक्तीचें माणसाच्या वैयक्तिक जीवनांत फार मोठें स्थान आहे असें ते मानीत असत. गेल्या वीस वर्षांत पायोरिया, बद्धकोष्ठ, निद्रानाश, ब्लड्प्रेशर वगैरे सर्व प्रकारचे आजार त्यांना अधूनमधून त्रास देत असत. परंतु त्यांच्या इच्छाशक्तीच्या जोरावर ते प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आणि त्या सर्व व्याधींना काबूंत ठेवून आपला व्यासंग चालूं ठेवीत असत.

तसे अण्णा धार्मिकदृष्ट्या नास्तिक नव्हते. राजकीय विचारांच्या बाबतींतसुद्धां ते अश्रद्ध नव्हते. पण विभूतिपूजा किंवा अंधश्रद्धा त्यांना आवडत नसे. गांधीजींवर त्यांची फार श्रद्धा होती. परंतु गांधीजींच्या राजकोटच्या उपवासापासून सामाजिक प्रश्न सोडविण्याचें अमोघ शस्त्र म्हणून गांधीजींच्या आत्मक्लेशाच्या मार्गावरील त्यांची श्रद्धा उडत चालली होती. "अहिंसात्मक सत्याग्रहाच्या मार्गानें गांधीजींनीं हिंदुस्थानांतील लोकांना निर्भय केलें हें त्यांचें फार मोठें कार्य मी मानतों. परंतु त्यांच्या उपवास वगैरे–सारख्या आत्मशुद्धीच्या मार्गांनीं हिंदुस्थानांतील राजकीय किंवा सामाजिक प्रश्न सुटतील असें मला वाटत नाहीं." असें अण्णा म्हणत असत. १९४० पासून तर ते मतानें जवळजवळ मार्क्सवादी बनले होते. "कम्युनिस्ट् अगर अन्य राष्ट्रांतून कम्युनिझम्च्या स्थापनेसाठीं होणारी हिंसा ही अपरिहार्य आहे. भांडवलशाही राष्ट्रांनीं आजपर्यंत केलेल्या पापांचीं हीं भुतें आहेत, व भांडवलशाहीच्या नाशासाठींच तीं अवतरलीं आहेत असें आपण मानलें पाहिजे." असे



अनुक्रमणिका






विचार ते आवेशयुक्त भाषेंत प्रतिपादन करीत असत.

आपल्या मुलांनीं कोणता मार्ग स्वीकारावा याबद्दल अण्णांचीं कांहीं विशिष्ट मतें असत. परंतु आम्ही मोठे झाल्यानंतर त्याबाबत त्यांनीं कधीं आग्रह धरला नाहीं. आईचा भक्तिमार्ग त्यांना पसंत नव्हता. पण तिच्या निष्ठेबद्दल ते आदर बाळगीत असत. माणसाची जीवनांतील निष्ठा अंध नसावी, तिच्यापासून जीवनांत सामर्थ्य निर्माण होईल अशी ती जिवंत असावी असें ते सुचवीत असत.

भाईनें संपूर्ण–ब्रह्मचय वृत्तीनें राहाण्याचें ठरवून संन्यस्त जीवन स्वीकारण्यापूर्वी अण्णांनीं त्याला परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. त्या मार्गांतील धोके सांगितले. पण त्याचा निश्चय दृढ आहे असें आढळल्यानंतर त्यांनीं त्याच्याबद्दल अभिमान बाळगला. एकुलता एक मुलगा ब्रम्हचारी राहिला म्हणून आईला कधीं कधीं खंत वाटत असे. पण अण्णा तिला पटतील अशीं उदाहरणें देऊन तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत. अण्णा आईला नेहमी बहुवचनानें संबोधीत. " भाईनें कामक्रोध यांवर जय मिळवला आहे. मुलानें चांगला प्रपंच केला तर सात पिढ्यांचा उद्धार होतो. पण मुलानें नैष्ठिक ब्रम्हचर्य पाळलें तर बेचाळीस पिढ्यांचा उद्धार होतो, आणि त्याच्या आईला पुरुषाचा पुनर्जन्म मिळतो. तुम्ही वंशच्छेद होईल म्हणून चिंता कशाला करतां? "-असें ते आईला सांगत असत.

गांधीजींच्या विचारसरणीबद्दल मला आकर्षण वाटूं लागलें हें दिसल्यावर मला ते म्हणाले, " तूं जें करीत आहेस तें पूर्ण विचार करून कर. तूं चरखा विकत घे. माझी हरकत नाहीं. पण मात्र नवीन खेळणं दिसलें कीं लहान मुलानें तें मागावें आणि थोडा वेळ खेळून झालें कीं फेंकून द्यावें असें तुझ्या चरख्याचें होऊं देऊं नकोस म्हणजे झालं. माझीं मुलं डोळस असावींत, भावनेच्या लोंढ्याबरोबर वाहात जाणारीं अशीं तीं प्रवाहपतित नसावींत असें मला वाटतें."

नाट्यव्यवसायिकाच्या मानानें अण्णांचें वाचन दांडगें होतें. महाराष्ट्र-नाटक-मंडळी चालवीत असतांना त्यांना वाचनाचा नाद होताच. परंतु कंपनी सोडल्यापासून जवळ जवळ तीस वर्षें त्यांनीं शॉ, इब्सेन, गॉल्सुवर्दी वगैरेंचीं नाटकें, पाश्चात्य नाट्यशास्त्र व रंगभूमि, त्याचप्रमाणें कम्युनिझम्, शिक्षण वगैरे विषयांवर अभ्यासू वृत्तीनें व्यापक वाचन व सखोल चिंतन केलें होतें. त्यांच्या छोट्याशा ग्रंथालयांत बरींच निवडक पुस्तकें आहेत. पुस्तक वाचतांना त्यांच्या हातांत नेहमीं तांबडी-निळी पेन्सिल असायची. त्यांनीं वाचलेल्या पुस्तकांवर केलेल्या खुणा व त्यांचीं टिपणें यांवरून कोणालाहि त्या त्या विषयावरील त्यांच्या मतांची पुरेशी कल्पना येऊं शकेल.

पाश्चात्य वाङ्मय, विशेषतः नाटकें किंवा नाट्य–शास्त्रावरील पुस्तकें वाचीत असतांना त्यांना आपल्या प्राचीन वाङ्मयांतील साम्यस्थळांचें व समान विचारांचें सहज स्मरण होई, व मग ते त्याची तेथेंच काळजीपूर्वक नोंद करून ठेवीत असत. उदाहरणार्थ, Allardyce Nicoll च्या Ihe Theory of Drama मध्यें ॲरिस्टॉट्लची Tragic Hero ची कल्पना वाचीत असतां अण्णांनीं तेथें भरतमुनीच्या नाट्यशास्त्रांतील " धीरोद्धतो धीरललितो धीरोदात्तस्तथैव च। ... ... " वगैरे नायकांचे चार प्रकार दर्शविणारी कारिका लिहून ठेवलेली आढळते. जॉर्ज बर्नार्ड शॉच्या नाटकांच्या प्रस्तावनासंग्रहाची Introduction वाचतांना अण्णांना व्यासाच्या आक्रोशाचें स्मरण झालें असून तेथें त्यांनीं ' ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति माम्। धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥ " हें अवतरण समासांत लिहून ठेवलें आहे. Rousseau च्या Emite or Education मधील pleasure, happiness and goodness या विषयीं केलेल्या विवेचनावरून अण्णांना उपनिषदांतील प्रेयस् व श्रेयस् या कल्पनांची आठवण झाल्याचें त्यांनीं नमूद केलें.

बुद्धिनिष्ठ ध्येयवाद हेंच अण्णांच्या जीवनाचें सार आहे. ' Not failure but low aim is crime ' हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें. प्रयत्नवादाचे ते मोठे पुरस्कर्ते होते. भगीरथ हा प्रयत्नवादाचा भारतीय आदर्श. अण्णांच्या महाराष्ट्र–नाटक–मंडळीच्या रंगभूमीवरील पहिल्या पडद्यावरसुद्धां भगीरथाच्या प्रयत्नांचें साफल्य दर्शविणारें गंगावतरणाचें चित्र जें त्यांनीं लावलेलें होतें तें हेतुपुरस्सरच लावलें होतें. त्यांच्या स्वतःच्या माडींतहि तोच एक फोटो लावलेला आहे.








कांहीं आक्षेपांना उत्तर : आचार्यभक्त द. वा. जोग

# “ वैदिक-शाङ्कर-अद्वैतमतानुवाद ” अर्थात् “ प्रस्थानत्रयभाष्याचा उपसंहार ”

माझ्या वरील ग्रंथावर अनेक थोर थोर अभ्यासकांनीं, पंडितांनीं आणि आधुनिक प्राध्यापकांनीं प्रशंसोद्गार काढून माझ्या ग्रंथाचा गौरव केला आहे तो पाहून मला फार समाधान वाटतें. कारण माझ्यासारख्या शाळामास्तरानें अध्यापनाव्यतिरिक्त सर्व प्रकारच्या शालेय गोष्टी संभाळून व तज्जन्य परिस्थितीशीं झगडून जें अल्पस्वल्प केलें त्याचा गौरव ‘परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यं निजहृदि विकसन्त: सन्ति सन्त: कियन्त:?’ या न्यायानें विरळ सांपडणाऱ्या गुणी लोकांनीं केला, त्यामुळें माझ्या श्रमाचें चीज झालें असें म्हणावयास हरकत नाहीं.

‘नवभारतां’त माझ्या ग्रंथावर श्री. दि. के. वेडेकर यांनीं गेल्या वर्षीं जानेवारी १९५५च्या अंकांत, पं. कोकजे यांनीं सप्टेंबर १९५५च्या, व पं. दिवेकरशास्त्री यांनीं डिसेंबर १९५५च्या – या अंकांतून परीक्षणात्मक लिहिलें आहे. साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांनीं नागपूरच्या ‘महाराष्ट्रां’त चार विस्तृत लेखांक लिहून समालोचन केलें आहे. हीं सर्व परीक्षणें वाचलीं म्हणजे जो मुद्दा एकाला दूषणास्पद वाटतो तोच नेमका दुसऱ्याला भूषणास्पद वाटतो हें वाचून पंडितांच्या ‘ भिन्नरुचित्वा’चें आश्चर्य वाटतें.

श्री. वेडेकर यांनीं परीक्षण करितांना विद्यार्थ्यांना व अभ्यासकांना हा ग्रंथ कसा उपयोगी आहे, वेदान्तासारख्या विषयावर मराठींत लिहिणें किती अवघड आहे व तें करीत असतांना लेखकाला कोणत्या अडचणी येतात व त्यांचें निवारण येथें कसें करण्यांत आलें आहे, आणि ह्या ग्रंथांत प्रतिपादिलेलीं प्रकरणें कशीं महत्त्वाचीं आहेत याचा सहृदयतेनें ऊहापोह केला आहे.

पं. कोकजे यांनीं आपल्या परीक्षणपर लेखांत माझ्या ग्रंथावर अनेक आक्षेप घेतले आहेत. ग्रंथाच्या नांवापासून आक्षेप घ्यावयास सुरुवात केली आहे. ‘अनुवाद’ हा ‘उपसंहार’ होणें शक्य नाहीं असें तर्कट लढविलें आहे. परंतु ‘ वैदिक शाङ्कर–अद्वैतमतानुवाद ’ यांतील प्रत्येक शब्दाचें पदकृत्य करून हें नांव कां दिलें आहे (मूळ ग्रंथ पा. ५ वर) तें लिहिलें, व कै. बापटशास्त्र्यांची ‘ प्रस्थानत्रय भाष्याचा उपसंहार ’ लिहिण्याची जी इच्छा होती ती पूर्ण करण्यांत येत आहे असें वाचकांनीं समजावें–म्हणून दुसरें नांव देण्यांत आलें आहे. पं. बाळशास्त्री हरदास यांनीं परीक्षण करतांना असाच उल्लेख करून ग्रंथाचें नामाभिधान किती अर्थपूर्ण आहे हें दाखविलें आहे.

“ ग्रंथांतील प्रकरणांची मांडणी सूत्रबद्ध नसल्यानें ग्रंथाला इतस्तत: विखुरलेल्या फुलांच्या सड्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. कोणत्या प्रकरणांत किती खोलांत जाऊन कोणता विषय किती मांडावा याचें तारतम्य नाहीं. उदा० श्रवणादिसाधनें दाखविणाऱ्या ३० पानांतील प्रकरणांत श्रवणाच्या विवेचनाला अवघें ½ पान देण्यांत आलें आहे, वगैरे ” असेहि आक्षेप पं. कोकजे यांनीं घेतले आहेत. परंतु विद्यार्थिवर्ग हा माझ्या ग्रंथाचा अधिकारी आहे. त्यांच्यापुढें जीं भलभलतीं मतें येत असतात त्यांचें निराकरण करून त्यांच्या परीक्षांना उपयोगी पडणारे सर्व विषय ऊहापोह करून त्यांना सोप्या भाषेंत समजावून देणें हें माझें मुख्य काम. तें करीत असतांना विद्यार्थ्यांना उपयोगी पडेल तेवढा



अनुक्रमणिका






ऊहापोह मीं केला आहे. आतां ' आत्मज्ञानासाठीं श्रवणादिसाधनें ' हेंच प्रकरण पाहूं. ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः ' हें ह्या प्रकरणाचें विषयवाक्य. येथें ' तव्य ' प्रत्यय विधिबोधक आहे. आत्मज्ञानाला विधि संभवतो का, हा प्रश्न येथें उपस्थित होतो. अर्थात् त्याचा ऊहापोह करण्यासाठीं अपूर्वविधि, नियमविधि, परिसंख्याविधि यांचें विवेचन करून शांकरमतानुयायी कांहीं पंडित हा अपूर्वविधि आहे असें म्हणतात; कांहीं नियमविधि आहे असें म्हणतात; तर कांहीं परिसंख्याविधि आहे असें म्हणतात; अर्थात् त्यांच्या मतांचा अनुवाद करणें मला भाग होतें. पुढें आचार्य विधि मानीत नाहींत हाहि पक्ष मला मांडावा लागला. उपनिषद्-वाक्याचें श्रवण करावें असें म्हणतांच वाक्य म्ह० काय, पद म्ह० काय, शब्दशक्ति म्ह० काय, पदांची शक्ति राहते कोठें ( जाति कीं व्यक्ति ), शब्द नित्य आहे कीं अनित्य आहे, स्फोटवाद म्हणजे काय, अभिहितान्वयावादी आणि अन्विताभिधानवादी यांचें काय म्हणणें आहे, तात्पर्य म्हणजे काय, तात्पर्यनिर्णायक सहा लिंगें कोणतीं इत्यादि विषय हाताळल्यावर ' श्रवणा'ला ३ पानापेक्षां अधिक लिहिण्याचें कांहीं कारण नव्हतें. पुढें परोक्ष शाब्दप्रमा, अपरोक्ष शाब्दप्रमा, प्रामाण्यविचार, ' यत् साक्षात् अपरोक्षात् ब्रह्म ' याचें विवेचन करून प्रकरण पूर्ण केलें आहे. यांतील प्रत्येक विषय विद्यार्थ्याला उपयोगी पडणारा आहे व तो सर्व सुसंगत आहे असें इतर विद्वानांच्या अभिप्रायावरून स्पष्ट होत आहे.

प्रकरणांची संगतीहि विचारपूर्वक बसविली आहे. तत्त्वज्ञानविषयक इंग्रजी ग्रंथांतून प्रकरणांची विभागणी व मांडणी कशी करण्यांत येते तें अभ्यासून आपल्याला ह्या ग्रंथांत तीं प्रकरणें कशीं मांडतां येतील हें पाहूनच सर्व लिहिलें आहे. प्रा. हुल्याळकरांनीं माझ्या प्रत्येक प्रकरणाचें महत्त्व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें कसें आहे तें आपल्या विस्तृत अभिप्रायांत दिलें आहे. प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीं वेदान्तांत ज्या विषयांना महत्त्व देण्यांत आलेलें आहे ते विषय उपोद्घात-स्वरूपांत मांडले आहेत. पहिल्या ' विषयप्रवेश ' प्रकरणांत आधुनिकांच्या चिकित्सक पद्धतीचा अवलंब करून ऐतिहासिक दृष्ट्या विवेचन केलें आहे. त्यांत पाश्चात्त्यांच्या मतांचें अंधानुकरण करणाऱ्या एतद्देशीय जुन्या पिढींतील प्राध्यापकांचें खंडन केलें आहे. ' ब्रह्मविचार ' ह्या दुसऱ्या प्रकरणांत ब्रह्माचें तटस्थलक्षण व स्वरूपलक्षण सांगून ब्रह्म हें जगाचें अभिन्ननिमित्तोपादानकारण कसें तें सांगितलें. पुढें तिसऱ्या प्रकरणांत त्याच्याच ( अभिन्नत्वाच्या ) निमित्तानें ' कार्य हें कारणाहून भिन्न नाहीं ' हें सिद्ध केलें. जगत् हें कार्य ब्रह्म ह्या कारणाहून भिन्न नाहीं; तर ब्रह्म अकर्तृ असतांना त्याच्यावर कर्तृत्वादि आरोप कां केला जातो हें दाखविण्यासाठीं ' अध्यास ' हें चवथें प्रकरण लिहिलें आहे. गुरु, शास्त्र, शिष्य इत्यादि गोष्टी अध्यास मानून सिद्ध होतात. पण अध्यासापेक्षां वेगळ्या रीतीनें व केवळ तार्किक पद्धतीनें शास्त्र, शिष्य, जगत् , जीव कांहींहि उत्पन्न झालेलें नाहीं हीच परमार्थता आहे असें सांगणारा ' गौडपादाचार्यांचा कल्पनावाद ' पांचव्या प्रकरणांत सांगितला. परिणामवादाचा अवलंब करून ' सृष्ट्युत्पत्तीचा विचार ' सहाव्या प्रकरणांत करून नंतर परम सिद्धान्त म्हणून मान्य असलेल्या विवर्तवादाचा अवलंब करून ' मायावाद अर्थात् विवर्तद्वारा अद्वैतसिद्धि ' हें सातवें प्रकरण लिहिलें. आचार्य मायानिरासवादी असल्यामुळें अध्यासाचा निरास करून जीवन्मुक्ति ते मानतात व अखेर जीवन्मुक्तीच्या द्वारा विदेहमुक्ति कशी मानतात हें ' विदेहमुक्ति व जीवन्मुक्ति ' ह्या आठव्या प्रकरणांत सांगितलें आहे. जीवन्मुक्तीचे जे अधिकारी नाहींत, अशा सामान्य जीवांचें उत्क्रमण आणि पुनरागमन कसें होतें तें नवव्या प्रकरणांत दाखविलें







आहे. पुनरागमनांतून म्हणजे पुनर्जन्मांतून सुटण्यासाठीं शास्त्रकारांनीं वैदिक वर्णांची आणि आश्रमांची व्यवस्था कशी केली आहे तें दहाव्या प्रकरणांत दाखवून मुक्तीचें परम साधन जें आत्मज्ञान तें मिळविण्यासाठीं श्रवणादिसाधनांचा विचार अकराव्या प्रकरणांत केला. बाराव्या प्रकरणांत सांख्य, नैयायिक बौद्ध, जैन इत्यादिकांचें खंडन केलें. व शेवटीं पूर्वार्धाच्या तेराव्या प्रकरणांत पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा ऊहापोह करून ' पुरुषार्थाची अद्वैतपर मीमांसा ' केली आहे. श्री. कोकजे म्हणतात त्याप्रमाणें प्रकरणांची व विषयांची मांडणी ही ' इतस्ततः विखुरलेल्या फुलांच्या सड्याप्रमाणें आहे ' कीं काय तें वाचकांनींच ठरवावें.

मुमुक्षूला गुरूची आवश्यकता आहे हें सांगण्यासाठीं गुरूला नौकेचा दृष्टांत दिला आहे. ' नदीं तितीर्षोः नौरिव ' ह्यावरून " मुमुक्षूला गुरूची आवश्यकता नाहीं " असें श्री. कोकजे सिद्ध कसें करितात हें एक गूढ आहे. मुक्ताला गुरूची आवश्यकता नाहीं हा तर सिद्धान्तच आहे. तितीर्षूला जशी नौका आवश्यक, तसा मुमुक्षूला गुरु आवश्यक. लोकनायक अणे ह्यांनीं पुरस्कारांत गुरूंची आणि सांप्रदायिक ग्रंथांची किती आवश्यकता आहे तें सांगितलें आहे.

सत्यकाम शिष्याला देवतांनीं ज्ञान दिलें असूनहि तो गुरूकडे येऊन ' मला उपदेश करा ' अशी याचना करितो-- ' आचार्याद् ध्येव विद्या वेदिता० ' –' आचार्यापासून प्राप्त झालेली विद्या अतिशय श्रेष्ठ व निर्दोष असते. ' तें ऐकून हारिद्रुमत गुरूनें देवतांनीं जशी विद्या सांगितली तशीच उपदेशिली. ( ग्रंथपान ६७७ पहा. ) ह्या ठिकाणीं श्री. कोकजे असा आक्षेप घेतात : ' सत्यकामाचें वचन पूर्वपक्षद्योतक असून तेथील सिद्धांत गुरूची आवश्यकता असतेच असें नाहीं हें स्पष्ट असतां प्रस्तुत ग्रंथकार तोच पुरावा म्हणून देत आहेत. सत्यकाम हा शिष्य अर्थात् पूर्वपक्षी म्हणून त्याचें वचन पूर्वपक्षद्योतक अर्थात् त्याच्या विरुद्ध सिद्धान्तपक्ष असला पाहिजे. ' हें तर्कतीर्थांचें अजब तर्कशास्त्र पाहण्यासारखें आहे. अर्जुन हा शिष्य. तो म्हणतो ' चञ्चलं हि मनः कृष्ण– ' मन फार चंचल आहे. अर्थात् हें वचन पूर्वपक्ष्याचें, तेव्हां सिद्धान्त हा उलट असला पाहिजे असें म्हणण्यासारखें हें हास्यास्पद आहे ! वेदान्त–ग्रंथांत सर्व ठिकाणीं हें वचन गुरूची आवश्यकता प्रतिपादितांना दिलेलें आढळतें.

" गुह्य म्हणजे गूढ अर्थात् कळण्यास कठीण; एवढाच अर्थ असतां लेखक त्याचा गुप्त ठेवण्यास योग्य असा अर्थ देतात, तो चिन्त्य आहे " असें श्री. कोकजे म्हणतात. ' गुह्य ' हें कर्मणि विध्यर्थक विशेषण आहे. त्याचा अर्थ गोपनीय–गुप्त ठेवण्यास योग्य हाच अर्थ योग्य आहे. कारण हें शास्त्र पुत्र नसलेला किंवा शिष्य नसलेला, द्रोह करणारा, तप न करणारा, भक्त नसलेला, जो प्रशांत नाहीं, जो जितेंद्रिय नाहीं–अशाला देऊं नये असें सांगितलें आहे. त्यावरून ' गुप्त ठेवण्यास योग्य ' हाच अर्थ विवक्षित आहे. गुह्य म्हणजे गूढ–कळण्यास कठीण असा अर्थ केव्हांहि होत नाहीं हें कोणाहि व्युत्पन्न माणसास कळण्यासारखें आहे.

' प्रत्यक्षादि सहा प्रमाणें ब्रह्माचें ज्ञान करून द्यावयास समर्थ नाहींत ', 'इंद्रियांना अगोचर असलेल्या विषयांचें ज्ञान आगमप्रमाणानें होणें शक्य आहे ', ' ज्ञानकांडांत जीवन्मुक्ताचा ब्रह्मसाक्षात्कार हें एक मोठें प्रमाण आहे ' हीं तीन वाक्यें माझ्या ग्रंथांतून घेऊन श्री. कोकजे यांनीं टीका केली आहे, ती सर्व गैरलागू आहे. लौकिक विषयांचें ज्ञान करून द्यावयास जीं प्रत्यक्षादि प्रमाणें समर्थ आहेत तीं इंद्रियांना अगोचर असलेल्या विषयांचें ज्ञान करून देत नाहींत. शब्द दोन प्रकारचा असतो. एक लौकिक व दुसरा आगम. लौकिक शब्द ब्रह्म, धर्म इत्यादि अलौकिक वस्तूंचें ज्ञान करून देत नाहीं.










ब्रह्माचें फक्त परोक्षज्ञानच आगमप्रमाण देतें. आगम जरी प्रमाण असला तरी त्याचा अर्थ मीमांसेनें मनुष्य करितो. मीमांसेनें जो अर्थ होईल तो योग्य कीं अयोग्य हें जीवन्मुक्ताच्या साक्षात्कारावरून ठरवावयाचें. म्हणजे शास्त्रप्रचीति, गुरुप्रचीति आणि आत्मप्रचीति यांची एकवाक्यता होण्याची वेदान्तशास्त्रांत फार आवश्यकता असते. आचार्य लिहितात : " धर्मजिज्ञासेमध्यें केवळ श्रुत्यादिकच जसें प्रमाण असतें तसें ब्रह्मजिज्ञासेमध्यें नसतें; तर श्रुत्यादिक व अनुभवादिक यथासंभव प्रमाण असतें. धर्मासारख्या कर्तव्यविषयामध्यें अनुभवाची अपेक्षा नाहीं; पण ब्रह्मज्ञानांत साक्षात्काराची आवश्यकता असते. " ( वे. भा. १-१-२ ). वरील तीनहि वाक्यें आचार्यमताला धरून लिहिलीं असतां 'ब्रह्मानुभवाच्या बलवत्तर प्रमाणाविषयीं आचार्यमत दर्शविलेलें नाहीं ' असें कोकजे म्हणतात. मीं मराठींत अनुवाद करीत आहे तेथें सर्वच ठिकाणीं आचार्यभाष्यांतून उतारे देण्याचें मला कारण नाहीं, तरी सुद्धां पान ५६ वर टीपेमध्यें आधार दिला आहे.

माझ्या विवेचनांतील दोष दाखवितांना " ज्ञान भावरूपी असतां ' अभावरूप ज्ञान ' असें म्हणणें " ( पा० ५७ ) असें लिहिलें आहे. हा आक्षेप वाचून मला तर अचंबा वाटला. कारण अज्ञान सुद्धां भावरूप आहे असें ग्रंथभर वारंवार प्रतिपादन करणाऱ्या माझ्याकडून ' अभावरूप ज्ञान ' असें कसें लिहिलें जाईल, असें वाटून मी तें पान उघडून पाहिलें. तेथें ' अनुपलब्धी'चें विवेचन करतांना मी असें लिहिलें आहे : " पुस्तक नसलेल्या जागीं त्या पुस्तकाचें अभावरूप ज्ञान उत्पन्न होतें. येथें पुस्तकाची अनुपलब्धि म्हणजे पुस्तकाचा प्रत्यय-अनुभव न येणें हें अनुपलब्धिप्रमेचें करण असल्या मुळें तें अनुपलब्धि–प्रमाण होय." येथें ज्ञानाला अभाव म्हटलें नसून पुस्तकाचें अभावरूप ज्ञान असें म्हणून व ह्याचेंच पुनः स्पष्टीकरण करून पुस्तकाचा प्रत्यय–अनुभव न येणें असें म्हटलें आहे. नैयायिक 'घटाभाव' 'पटाभाव' जसें म्हणतात तसा ' पुस्तकाभाव ' म्हटला आहे; अनुपलब्धिप्रमा असें म्हणावयाचें असल्यामुळें ज्ञान हा शब्द ठेवला आहे. ज्ञान हें भावरूप का अभावरूप असा प्रश्न उपस्थित करून तें अभावरूप आहे असें ठरविलें असतें तर तो माझा खराच मूर्खपणा झाला असता.

पं. कोकजे यांनीं मूल्यकल्पनांची पुरुषार्थकल्पनेशीं मी गल्लत केली आहे असा एक आक्षेप घेतला आहे. मी पाश्चात्यां ( Value Philosophy ) च्या दृष्टीनें ऊहापोह केला. Value ह्याला कोशामध्यें कोणत्या अर्थीं हा शब्द वापरला आहे तें दिलें आहे. Value म्हणजे मूल्य, अर्थ, अर्थवत्ता, इष्टवस्तु, पुरुषार्थ—इतके शब्द निरनिराळया प्रसंगानें दाखविले आहेत. ' माणसें ज्या गोष्टींसाठीं धडपड करितात आणि ज्यांसाठीं त्यांनी धडपड करावी त्या गोष्टी म्हणजे पुरुषार्थ ( पान ५५० ) असून भारतीय तत्त्वज्ञानांत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे जे पुरुषार्थ मानले आहेत ते इतर सर्व पुरुषार्थांचें मूल्यमापन करण्यासाठीं होत. भारतीय पुरुषार्थ ह्या मूल्यमापनाच्या कसोट्या होत. पाश्चात्यांनीं जे जे पुरुषार्थ सांगितले, त्यांची योग्यायोग्यता व इष्टानिष्टता आमच्या पुरुषार्थकल्पनेच्या निकषावर घासून त्यांचें मूल्यमापन आम्ही करणार. 'Aims of human activity ' ह्याला उद्देशून वापरलेल्या पुरुषार्थांची इष्टानिष्टता Values ह्या अर्थीं वापरण्यांत आलेल्या भारतीय तत्त्वज्ञानांतील पुरुषार्थचतुष्टयानें आम्ही सिद्ध करून तें मोक्षोपयोगी आहे किंवा नाहीं याची मीमांसा या प्रकरणांत केली आहे. दैवी संपत्ति आणि आसुरी संपत्ति हीच मुळीं पुरुषार्थचतुष्टयाच्या मापानें ठरविण्यांत आलेली आहे. दैवी संपत्ति ही मोक्षोपयोगी आहे व आसुरी संपत्ति बंधाला कारण आहे असें ठरविण्यांत आलें आहे. श्रेय आणि प्रेय हें ज्ञानाचें व धर्माचें अनुक्रमें फल आहे. हें फल










Value होऊं शकत नाहीं. ( Aim आणि Value हीं अलग अलग न राहतां त्यांचें ऐक्य भारतीय पुरुषार्थामध्यें होत असल्यामुळें भारतीय तत्त्वज्ञान श्रेष्ठ होय. ) मी लिहिलेलें संपूर्ण प्रकरण वाचून त्यांत प्रतिपादन केलेल्या मूल्यांची निर-निराळ्या प्रकारांनीं केलेली विभागणी लक्षांत आणून विद्वानांनीं माझें प्रकरण वाचावें. सर्वकर्मसंन्यास हा शब्द आचार्यांनीं चतुर्थाश्रमापासून विद्वत्संन्यासा-पर्यंत जसा वापरला आहे तसा पुरुषार्थ हा शब्द क्षुद्र पुरुषार्थापासून श्रेष्ठ पुरुषार्थापर्यंत वापरला असून धर्मादि पुरुषार्थ ह्याच मुख्य कसोट्या असून त्यांनाच आम्ही Value असें म्हटलें आहे.

नियम आणि परिसंख्या–विधींबद्दल जें श्री. कोकजे यांनीं लिहिलें आहे, त्यांत त्यांचा थोडासा दृष्टिभ्रम झालेला आहे. ' **सोडण्यासारख्या** प्राप्त अंशाची निवृत्ति करून अप्राप्त अंशाचें पूरण नियम विधीनें होतें असें जें लेखकानें लिहिलें आहे तें भ्रामक आहे ' असें श्री. कोकजे यांनीं लिहिलें आहे. 'सोलण्यासारख्या' असा शब्द माझ्या ग्रंथांत असतां तेथें त्यांनीं 'सोधण्यासारख्या' असें वाचल्या-मुळें सोडणें म्हणजे अर्थात् वगळणें असें मनांत आणून जें लिहिलें आहे तें सर्व हास्यास्पद आहे.

वेदान्त्याच्या वेदनित्यत्वाबद्दल थोडासा खुलासा करणें भाग आहे. कारण तो शास्त्रार्थ आहे. बौद्ध क्षणिकत्व मानणारे आहेत; त्यांच्या मानानें तार्किक तीन क्षण मानणारे आहेत. त्यांच्यापेक्षां शब्दनित्यत्व मानणारे मीमांसक ' कर्तुरस्मरण ' इत्यादि हेतूंनीं वेदांचें नित्यत्व मानतात. ह्याचा अनुवाद बादरायणांनीं ' अत एव च नित्यत्वम् ' ( १-३-२९ ) या सूत्रांत केला व आचार्यांनींहि तसेंच प्रतिपादिलें. पण परमेश्वरानें निश्वासाप्रमाणें वेद उत्पन्न केले, ' अप्रयत्नेनैव लीलान्यायेन पुरुष-निश्वासवद्यस्मान्महतो भूताद्योनेः संभवः अस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वेदः इत्यादि श्रुतेः । ' असें आचार्यांनीं 'शास्त्रयोनित्वात्' या सूत्रावरील भाष्यांत लिहिलें आहे. अर्थात् मायिक ईश्वरापासून प्रयत्ना-विना लीलान्यायानें वेद निर्माण होतात असें आचा-र्यांनीं म्हटलें असल्यामुळें आचार्यांचा परमसिद्धांत मीमांसकांच्या वेदनित्यत्वाप्रमाणें असणें शक्य नाहीं. ' जीव ईशो विशुद्धा चित् ' ह्या श्लोकांत सांगित-लेल्या ईश्वराचें अनादित्व ज्या किंमतीचें आहे, त्याच किंमतीचें ईश्वराचें नित्यत्व आहे. मायिक ईश्वर अनित्य असल्यामुळें त्यानें निर्माण केलेले वेद हे सुद्धां अनित्य ( ईश्वराइतपत ) होत, असें समजणें योग्य होय. एखाद्या सूत्रावरील भाष्य पाहून आचार्यमत न ठरवितां सर्व ठिकाणचे विचारप्रवाह लक्षांत घेऊन मत मांडलें पाहिजे, तसें मांडलें आहे. तसें मांडतांना ( १–३।२९ ) या सूत्राचा उल्लेख अगोदर करावयास पाहिजे होता हें खरें. असो. पंडित कोकजे यांनीं हा विषय माझ्या नजरे-समोर आणल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

वे. शा. महादेवशास्त्री दिवेकर यांनीं माझ्याशीं अनेकदां विचारविनियम करून माझेकडून खुलासा करून घेतला होता, तरी त्यांनीं जीं वैगुण्यें दाख-विलीं आहेत त्यांच्याबद्दल थोडेसें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे.

वृत्तिकार, अपर व अन्ये हे तिघे एकच कीं भिन्न ? ते कोण ? त्यांनीं कोणते ग्रंथ लिहिले ? ते केव्हां जन्मास आले ? याची माहिती मला नाहीं. मी ज्या ज्या पंडितांना विचारली त्यांनाहि नव्हती व नाहीं अर्थात् हें वैगुण्य म्हणून मान्य करितां येत नाहीं.

कार्याध्यास व कारणध्यास यांचें विवेचन थोडक्यांत केलें आहे. त्याचें विस्तृत विवेचन पुढच्या आवृत्तीत करूं. विद्यार्थ्यांना दोन्ही व्याख्या कशा लावाव्या एवढें दिग्दर्शन केलें आहे, तें परी-क्षेच्या दृष्टीनें पुरेसें आहे असें वाटून अधिक लिहिलें नाहीं.








चोदना हें धर्माचें लक्षण असून ती स्वविषयाचे ठिकाणीं पुरुषाची योजना करीत असतांना त्याला बोध करून देते. ब्रह्मचोदना पुरुषाला केवळ बोध करून देते. बोध-ज्ञान हें ' चोदनाऽजन्यत्वात् ' चोदनेनें उत्पन्न होणारें नसल्यामुळें चोदना ही ज्ञानाचे ठिकाणीं पुरुषाची प्रवृत्ति करीत नाहीं. ( विषयाचें ज्ञान व्हावयास ज्याप्रमाणें नियोगाची – चोदनेची अपेक्षा नसते त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान व्हावयास पुरुषाला चोदनेची अपेक्षा नाहीं ) – हा माझा अनुवाद संपूर्ण चुकलेला आहे असें श्री. दिवेकरांचें म्हणणें. मराठी भाषेंतील सर्व भाषांतरकार मी सांगितल्याप्रमाणेंच अर्थ करीत आहेत. चोदना हा शब्द मीमांसेंतला असून त्याला विशिष्ट अर्थ आहे तोच स्वीकारून ' अजन्यत्वात् ' या हेतूनें धर्मचोदना आणि ब्रह्मचोदना यांतील फरक स्पष्ट केला आहे. असा पाठ आचार्यांचा सिद्धान्त चांगला प्रकट करीत असल्यामुळें तो जास्त चांगला असें माझें निश्चित मत आहे.

आचार्य जडकारणवादाचें निराकरण करीत असतांना ' चेतन'-कारणवादाची प्रस्थापना करितात. आचार्यांनीं जगाचें कारण चेतन आहे हें सांगतांना ब्रह्म, परमात्मा, ईश्वर असे शब्द वापरले आहेत. निर्गुण ब्रह्म अधिष्ठानत्वानें ईश्वराचें व सृष्ट्युत्पत्तीचें कारण आहे. ब्रह्मविचारांत ब्रह्म हें जगाचें अभिन्ननिमित्तोपादानकारण आहे असें प्रतिपादिलें आहे. ईश्वर मायेच्या द्वारा कारण होतो. माया ही उपादानकारण व ईश्वर हा निमित्तकारण असें ग्रंथांत सर्व ठिकाणीं प्रतिपादिलें आहे. (पान ६१, १२८, २५६, २५७, ३१०, ३३५, ३३७, वगैरे ). शिवाय मायेच्या कारणत्वानें विचार करितांना ३३१ पानापासून ३३४ पानापर्यंत ऊहापोह केला आहे. याविषयीं मी संभ्रम उत्पन्न केला असें श्री. दिवेकर म्हणतात तें खरें नव्हे.

' आचार्यांनीं छांदोग्यभाष्यामध्यें २।३ ठिकाणीं आभासवादच मान्य केला असतां त्याचा उल्लेख नाहीं ' असें श्री. दिवेकरांनीं लिहिलें आहे. आभासवादाला सूत्रांचीं आणि उपनिषदांचीं वचनें प्रमाण म्हणून दिलीं आहेत. त्यावरून बोध होण्यासारखा आहे. सर्व ठिकाणचीं भाष्याचीं वचनें संगृहीत करण्याचें कारण नाहीं. अवच्छेदवाद, आभासवाद, प्रतिबिंबवाद या तिन्ही वादांना भाष्यवचनें मिळत असतांना छांदोग्यावरील भाष्यांतील २।३ वचनांनीं आचार्यांना आभासवादच मान्य आहे असें कसें म्हणतां येईल ? असो.

पं. कोकजे यांनीं आपल्या परीक्षणांत भाषेबद्दल, उपयुक्ततेबद्दल, सोपेपणाबद्दल व एकंदर प्रतिपादनाबद्दल गौरवपर शब्द न लिहिल्यामुळें सामान्यवाचकांचा व ज्यांनीं ग्रंथहि पाहिला नाहीं त्यांचा गैरसमज होतो म्हणून मी हें उत्तर द्यावयास प्रवृत्त झालों.

पूज्य श्री. विनोबाजी भावे यांनीं सुचविल्याप्रमाणें जैन व बौद्ध ग्रंथकारांनीं आचार्यांचे पश्चात् जें लिहिलें आहे त्याचा भारतीय तत्त्वज्ञानावर कोणता परिणाम झाला आहे ? तो इष्ट का अनिष्ट ? पारिभाषिक शब्दांच्या अर्थामध्यें कांहीं गैरसमज आहेत किंवा काय ? हें सर्व अभ्यासून लिहिण्याचा माझा मानस आहे. एक तपानें त्याचें फळ जनतेच्या हातीं पडेल अशी आशा व्यक्त करून मी हा लेख पूर्ण करितों.










## पुस्तक-परामर्श

**ध्वनिविचार** – ले. डॉ. नारायण गोविंद कालेल-कर एम्. ए. डी. लिट्., डेक्कन कॉलेज हॅन्डबुक सीरीज : ५ : डेक्कन कॉलेज...इन्स्टिट्यूट, पुणें, १९५५ किं. ५ रु.

परीक्षण-लेखकापुढें तीन पर्याय असतात. अनुकूल वा प्रतिकूल शेरे देऊन त्यांच्या पुष्ट्यर्थ थोडीं किंवा बहुत उदाहरणें देणें; पुस्तकाचें निमित्त करून त्या विषयावर जवळजवळ स्वतंत्र लेख लिहिणें; किंवा मुळाला एक भिन्नमतपत्रिका व शुद्धिपत्र जोडणें. प्रस्तुत 'ध्वनिविचार' या पुस्तकाबाबत आपल्याकडे फारशा प्रचलित नसलेल्या तिसऱ्या पर्यायाचा मी येथें अवलंब करणार आहे.

भाषेच्या अभ्यासाच्या वर्णनात्मक वा एककालिक आणि ऐतिहासिक वा द्वैकालिक अशा दोन दिशा लेखकानें [ प्रस्तावना पृ. ( २ ) - ( ३ ) ] कल्पिल्या आहेत. 'द्वैकालिक' याचें स्पष्टीकरण 'दोन काल-बिंदूंनीं मर्यादित केला गेला असल्यामुळें' असें दिलें आहे. लेखकाला अभिप्रेत असलेला आणि सोसूॅरच्या diachronique या शब्दानें व्यक्त होणारा अर्थ 'कालसापेक्ष' या शब्दानें जास्त चांगला प्रकट होईल असें मला वाटतें.

"ध्वनि निर्माण होतात, ते हवेमधून पसरतात ( द्रुति ) व ऐकूं येतात. पैकीं निर्मितीचाच विचार भाषाशास्त्रांत होतो – हाच ध्वनिविचार. हे ध्वनी विशिष्ट भाषेच्या व्याकरणव्यवस्थेंत वागतातसंवरतात त्याचा विचार म्हणजे वर्णविचार." ( पृ. ११-१२ ) खरें म्हटलें तर द्रुतीचा विचार पदार्थविज्ञानांत होतो, निर्मिति व श्रुति यांचा विचार पदार्थशास्त्र, जीवशास्त्र, व मानसशास्त्र यांमध्यें येतो. भाषाशास्त्राला यांचा कामापुरता जो अभ्यास करावा लागतो तो ध्वनिविचार असें पाहिजे तर म्हणावें. 'एककालिक' व 'काल-सापेक्ष' हा भेद वर्णविचाराला लागूं पडतो; ध्वनि-विचार हा सार्वकालिक आहे. माणसाच्या उक्ति व श्रुति यांमध्यें ऐतिहासिक काळांत किंवा निरनिराळ्या मानववंशांत जरी फेर पडत असला तरी त्याचा विचार भाषाशास्त्राच्या कक्षेंत येत नाहीं. तसा फेर पडत नाहीं या जीवशास्त्राच्या हवाल्यावर भाषा-शास्त्र विसंबून चाललें आहे. ध्वनिविचार करतांना भाषाशास्त्रज्ञ निर्मितीचें शारीर अंग एवढ्याचाच विचार करतात, याचें इंगित निराळें आहे. एक तर – तो आप-द्धर्म आहे; निर्मितीचें मानस अंग, द्रुति, श्रुति यांबद्दल आपल्याला पुरेशी माहिती नाहीं. जी आहे ती समजण्यास सोपी नाहीं. दुसरें असें कीं, भाषेच्या एककालिक अभ्यासाला म्हणजे ध्वनींचें साम्यभेदानुसार वर्गीकरण करावयाला ध्वनिव्यापाराची कोणतीहि एक अवस्था तत्त्वतः पुरेशी आहे. कारण जे साम्यभेद सर्व अवस्थांतून सिद्ध होतील त्यांचाच भाषेला उप-योग आहे. उदा०, जे भेद कानाला उमगतात, पण तोंडांतून हुकमी काढतां येणार नाहींत, ते ध्वनिविचा-रांत दुर्लक्षिले तरी चालतात. ( उदा० हुंदके, हास्य ). उलट पक्षीं, निर्मितीमधील जे सूक्ष्म फरक-विशेषतः घशामधील – आपल्याला अवलोकितां येत नाहींत तेथें आपण कानानें पडताळा घेतों. जन्मापासून बहिऱ्या माणसाला हा घेतां येत नाहीं; म्हणून त्याची निर्मिती-वर पुरेशी हुकमत येत नाहीं.

'जिह्वामूल' म्हणजे ( अ ) Epiglottis ( पृ० १२, आकृति २ ) का ( ब ) Root or far back of the tongue ( पृ. १४ ) का ( क ) मृदुतालूच्या समोरचा जिभेचा भाग ( संस्कृत जिह्वा-मूलीयाचें किंवा क-वर्गाचें स्थान ) ?

लेखकानें दिलेले दोन अर्थ व तिसरा प्रचलित अर्थ यांमुळें वाचकाचा घोटाळा होईल. ( यांपैकीं जिभेचा सर्वांत मागचा भाग ( ब ) मागें नेऊन स्पर्श जरी करतां येत नाहीं तरी घर्षकध्वनि उत्पन्न करतां येतो. उदा० 'मुहम्मद' मधील ह चा मूळ अरबी उच्चार.)

"तालुपटानें हवेची तोंडांत येण्याची वाट बंद करतां येते." ( पृ. १३, ओळी ५-६ ) – करतां येत नाहीं हें पडजीभ पाहिल्यावर सहज समजेल.

"स्वरनालिकांचें वागणें निश्चित दोन वर्गांत घालतां येतें : स्तब्धता आणि कंपन." ( पृ० १५, ओळी ३-६; तुलनार्थ : पृ. ३३, खालून ओळी २-३ ) — — तें तसें घालून भागत नाहीं ही तर मोठी अडचण आहे, आणि महत्त्वाचे पोटभेद सुद्धां अनेक आहेत, हें उघड आहे. सकंप प्राण अथवा श्वास ( संस्कृत ह;

---

'ध्वनिविचार' या पुस्तकाच्या अंतरंगाचा स्थूल परिचय डॉ. सु. गो. पानसे यांनीं गेल्या अंकांत करून दिलाच आहे. – का. सं.








घ, ध इत्यादि ' चतुर्थ ' व्यंजनांचा घटक ), निष्कंप प्राण ( विसर्ग; इंग्लिश ह; ख, थ इत्यादि द्वितीय व्यंजनांचा घटक ), प्रवाही ध्वनि ( स्वर व ' मृदु ' व्यंजनांचा घटक असा ' नाद ' ), कंठमुख बंद ठेवून उघडणें ( खोकणें, कुंथणें, जर्मन आद्यस्वराघात ) एवढे प्रकार लेखकानेंच सांगितले आहेत. शिवाय निष्कंप–निर्घर्ष प्राण ( ' कठोर व्यंजनांचा घटक, संस्कृत परिभाषेंतील ' श्वास ', breath ) आणि कुजबुजतांना स्वर व ' मृदु ' व्यंजनांमध्यें प्रवाही ध्वनीच्या ऐवजीं येणारा घटक हे दोन तरी निदान ध्वनिविचारांत घ्यायला हवेत.[१]

" सकंप ( किंवा संस्कृत व्याकरणाच्या भाषेंत ... मृदु) " ( पृ० १५ ). – ही नजरचूक दिसते. कठोर व मृदु हे अनुक्रमें hard, fortis किंवा soft, lenis याला प्रतिशब्द म्हणून आले. सकंप ( किंवा संस्कृत परिभाषेंत ' घोषवत् ' ) ध्वनि कठोर असूं शकतात. ( संस्कृत ह, त्याचा मृदु म्हणजे कोणताहि स्वर). उलट निष्कंप ध्वनि मृदु असूं शकतात. ( ' नागपूर ' मधील ' ग ' चा बोलभाषेंतील उच्चार हा ' नागवळी ', 'नाकतोड्या' मधील 'ग' 'क' यांपेक्षां वेगळा आहे ).

" धृति ' ( फ्रेंच tenue ) म्हणजे ' अडवलेली हवा धरून ठेवणें ' ( पृ. १९ ) का ' ध्वनि निर्माण करतांना केलेली तोंडाची रचना ( उद्घाटन ) स्थिरप्राय ठेवणें ' ( पृ. २३, ५५ ) ?

यापैकीं दुसरी व्याख्या समावेशक असल्यानें ती कायम करणें सोयीचें दिसतें. ' अडवलेली हवा धरून ठेवणें ' हा मग धृतीचा एक प्रकार ठरेल.

" ओठ एकाच ठिकाणीं....ओष्ठ्य व्यंजन हें सर्वत्र एकाच प्रकारचें असतें. " ( पृ. २१ ).

येथेंच दंतौष्ठ्य स्फोटकाचा उल्लेख यावयास पाहिजे. ( हा f पेक्षां भिन्न आहे. )

' तालव्य म्हणजे जिह्वापृष्ठ टाळूकडे नेल्यानें होणारा उच्चार' (पृ. २१) का जिह्वाग्र, दांत आणि तालुशिखर ( मूर्धा ) यांच्या मधल्या भागाकडे नेऊन होणारा उच्चार ( पृ. २५, पृ. ३९, शेवटची ओळ ) ?

यांपैकीं पहिला अर्थ रूढ अर्थाला जवळ असल्यानें ग्राह्य धरावा. जिह्वाग्र ओठांपासून मृदुतालूपर्यंत कोठेंहि लागू शकतें. यापैकीं ओठांचा आणि मृदुतालूचा विचार नाहीं केला तरी चालेल.[२]

---

१ कालेलकरांची घोटाळ्याची परिभाषा टाळून थोडक्यांत असें मांडतां येईल :




( नादाखेरीज इतर प्रकारची कंपनें असतात, पण त्यांचा विचार नाहीं केला तरी चालेल. )

२ म्हणजे पुढील भेद या अनुरोधानें दिसतात.

" बाह्यदृष्टया ( म्हणजे कानाला ) सारख्या वाटणाऱ्या ध्वनींमधील स्पर्शस्थानाचें अंतर " ध्वनिलेखनांत दिसून येतें. " ( पृ. २३ ). येथें " ध्वनिलेखनांत ' म्हणजे काय ? " कांहीं विशिष्ट पद्धतीनें क्ष–किरणानें तोंडाचा फोटो काढला तर " किंवा " कृत्रिम टाळूवर जिभेचा ठसा उमटविण्याची व्यवस्था केली तर " अशी शब्दयोजना योग्य दिसेल.

" षमध्यें जिह्वाग्र तालुशिखराला लागतें. " ( पृ. २४ ) – लावून पहावें; ष ऐवजीं ट किंवा मूर्धन्य च किंवा निष्कंप ळ उत्पन्न होईल.

" निष्कम्प य : नेहमींचा सकंप य आणि श : झ ( फ्रेंच झ ) या तालव्य घर्षकाच्या दोन जोड्या " ( पृ. २४, २६, २९, ९२ ) – या दोन जोड्यांतील फरक कोठेंहि स्पष्ट झालेला नाहीं. पृ. २६ वरील य च्या वर्णनाप्रमाणें उच्चार केल्यास झ उत्पन्न होतो. खेरीज पृ. ५४ वर तालव्य घर्षकांची X', Y' ग्रीक गॅमा ही तिसरी जोडी आहेच.

" संस्कृत र मूर्धन्य आहे. " ( पृ. २५ ) – या मुद्द्याचा उल्लेख वर आला आहेच.

" याशिवाय जिभेचें टोंक...... एक र उच्चारतां येतो. ' ( पृ. २५ ) – येथें कालेलकरांना पॅरिसचा फ्रेंच र ' ( r grasseye' ) अभिप्रेत असावा. पण येथें कंपन कशाचें होतें हें सांगितल्याशिवाय वर्णन अपुरें राहतें. या र मध्यें कंपन जिह्वाग्राचें न होतां पडजिभेचें होतें. या ' र ' ला अंततालव्य किंवा अलिजिह्वीय रेफ म्हणतां येईल.

" संस्कृत च हा तालव्य अर्धस्फोटक आहे. " ( पृ. २८ ).

तो पूर्वीं पूर्व–वा–कठोर तालव्य स्फोटक असावा असें एक मत आहे.

' gh ( अरबी ' बाघ ' मधला ) '–' बाघ् ' ( मराठी ' बाग ' हा शब्द फारसी आहे; अरबी उदाहरण द्यायचें तर ' घरीब् ' ( मराठी ' गरीब ' ) हें देतां येईल.

" कांहीं वर्ण ' स्वतंत्रपणें वापरले जात नाहींत ' " ( पृ. २९,४४ ) म्हणजे काय ? मराठी ङ्, ञ् आणि एकंदरींत निष्कंप ह्, य्, र्, ल् यांबद्दल हें विधान आहे. हीं व्यंजनें नेहमीं व्यंजनाला जोडून येतात, असा कदाचित् अर्थ असावा. पण इंग्लिश h, जर्मन ich-laut, वेल्श rh आणि ll ( अनुक्रमें निष्कंप ह्, य्, र्, ल् ) यांबद्दल हें खरें नाहीं.

आकृति ९ ( पृ० ३० समोर ). ' ओठ ' लिहिलें आहे तिथें ' दांत ' वाचावें.

आकृति ११ ( पृ० ३२ समोर ) – ' स्वरांचे स्पर्शबिंदु ' याउलट प्रकरण २ टीप ४ ( पृ. १८८ ) पहा : ' स्वरोच्चारणांत ...... स्पर्श व स्पर्शस्थान यांचा प्रश्न उद्‌भवत ' नाहीं. ह्यांतील विसंगति स्पष्ट आहे.

" कंठमुख बंद करून उघडणें. " ( पृ. ३५ ) – याला कंठस्थ स्फोटक म्हणावें. ह्याचें परिचित

---

पारंपरिक परिभाषेंत : ' तालव्य ' = ( ५ ); ' कंठ्य ' = ( ६ ); ' दन्तमूलीय ' = कांहींच्या मतें ( १ ) व ( २ ) च्या सीमेवर, कांहींच्या मतें ( २ ); ' प्रतिवेष्टित ' = जिह्वाग्र उलटें वळविणें.

जिभेचें अग्र किंवा पृष्ठ मध्यें स्पर्श करीत आहे आणि हवा एका किंवा दोन्ही कडांनीं वहात आहे अशा ध्वनींना ' पार्श्विक ' म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. म्हणजे द्रव वर्णांचे दोन प्रकार : ' पार्श्विक ' व ' रेफ. ' रेफांचें वैशिष्टय म्हणजे जिह्वाग्र किंवा पडजीभ यांचें कंपन किंवा स्फुरण.

एक ते पांच वर्गांतील ' पार्श्विक ' व्यंजनांचीं उदाहरणें : ( १ ) संस्कृत ल; ( २ ) Little मधील दोन्ही l ( केवळ दुसरा नव्हे ); ( ४ ) संस्कृत ळ; ( ५ जुन्या फ्रेंचमधला तालव्य l ( पृ. ६७ ). मराठी ळ कालेलकर पृ० २५ वर ( ३ ) मध्यें, पृ० ८२ वर ( ४ ) मध्यें घालतात. तो कधीं ( ३ ), कधीं ( ४ ) असावा असें वाटतें; जास्त अभ्यासाची जरूरी आहे.

संस्कृत ' र ' बद्दल निरनिराळीं मतें आहेत : ' दन्तमूलीय ' [ म्हणजे ( १ ) व ( २ ) यांच्या सीमेवर ), ' वार्स्य ( = ' प्रत्यक् दन्तमूलीय ' = कांहीं शिक्षाकारांच्या परिभाषेंत ' दन्तमूलीय ' = ( २ ], ' मूर्धन्य ' ( ४ ), व ' हनुमूलीय ' ( म्हणजे पडजिभेचें कंपन uvular trill असावें कीं काय ? ) ( सिद्धेश्वर वर्मा : Critical Studies in the Phonetic Observations of Indian Grammarians, १९२९, पृ० ६ पासून पहा. )








रूप : मुलें बाराखडी क क्का कि क्की अशी म्हणतात, याच चालीवर अआ इई म्हणूं लागलें तर हा स्फोटक अ व आच्या दरम्यान इ व ईच्या दरम्यान ऐकूं येतो.

" अंतःश्वास वर्ण. " ( पृ० ३७ ) ] आणखी एक उदाहरण म्हणजे वेदना झाल्यावर स् असें आपण म्हणतों तो ध्वनि. सिंधी व इतर कांहीं भारतीय भाषांत असे वर्ण आहेत असें कांहींचें म्हणणें आहे.

" ञ् ( म्हणजे सानुनासिक य् ) मराठींत येतो. " ( पृ० ४५ ) ] माझ्या मतें ' नञ् ' सारखे शब्द सोडल्यास बोली मराठींत तो ' संयम ' सारख्या शब्दांत मात्र येतो. ( स + ञ् + यम् ). पण कालेलकर तेथें सं + य् + यम अशी फोड करतात ( प्र० २, टीप १, पृ० १८७ ). संचय, चंची, सांजा यामध्यें मला जिह्वाग्रीय अशा न चे निरनिराळे प्रकार ऐकूं येतात; सानुनासिक य ( यँ् ) हि ऐकूं येत नाहीं ( प्र० ९, टीप १, पृ० १९० पहा ) किंवा संस्कृतमधील जिह्वापृष्ठीय सस्पर्श नासिक्यहि ऐकूं येत नाहीं.

" अनुस्वार ( उदा० आतां, गहूं, संय्यम, किंव्वा ) हें तत्त्व स्वरांच्या मागून येतें. " ( पृ० ४५ )— ही नजरचूक असावी. कारण पृ० ३३ वर ( ओळ ३–५ ) अनुनासिकत्व स्वरोच्चारणांच्या वेळींच येतें असें वर्णन आहे. व तें बरोबर आहे.

" तत्सम शब्द सोडले तर मराठींत च, ज, झ हे इ, य, ए अगोदर तालव्य; इतर ठिकाणीं दन्त्य असतात. " ( पृ. ४५–४७ ) ' दंत्य ' ऐवजीं 'दन्तमूलीय' पाहिजे. असो. ' इ, य ' सोडून दिले तर बाकीच्यांबद्दल निश्चितीनें विधान करणें किती धाडसाचें आहे हें मो. के. दामल्यांनीं दाखवून दिलें आहे. ( शास्त्रीय मराठी व्याकरण, १९११, ५८ पहा ). तत्सम नसलेल्या शब्दांची पुढील यादी यासाठीं मोठ्यानें वाचावी. ( इ, ए, य, नसतांना तालव्य ) चरबी, चैन, चुप, मचूळ, चोपन्न, जंगी, जय्यत, बोजा, कंजूष, आजोळ, झकास, झूट; ( ए असून दन्तमूलीय ) उंचेला, त्याचें, लाजेनें, जे, विझेल, तुझें. आतां हें खरें आहे कीं उच्चारा-उच्चारांत फरक असतो. उदाहरणार्थ, ' लाजे ' मधील ' ज ' कालेलकर तालव्य उच्चारतात ( पृ. ४६ ), मी दन्तमूलीय उच्चारतों. तरीहि या यादीचा उपयोग आहे.

भाषेच्या वर्णमालेंत अ : व : क = क्ष : य : झ अशा स्वरूपाची संगति हटकून मिळते; यांत एखादें पद कमी पडेल; पण मिळत्या वर्णांमधील साम्यभेद एकाच सूत्रानें सांगतां येतात. जोडींतील एक वर्ण बदलला असला तर दुसरा त्याच दिशेनें बदलला असणार असें समजावें. ( पृ० ४७–४९ ) ]. या सर्वसाधारण प्रवृत्ती आहेत हें खरें, पण त्या निरपवाद कां असाव्यात हें समजत नाहीं. यामध्यें एक तर बराच ढोबळपणा पत्करावा लागतो. कालेलकरांनींच दिलेलें इंग्रजीचें उदाहरण घ्या.

t : p = th : f

यांत t दन्तमूलीय, p ओष्ठ्य, th दन्त्य, तर f दंतौष्ठ्य आहे. किंवा ' अभाव हा सुसंवादीपणाला विरोधक नसतो ' या पळवाटीचा वरचेवर आश्रय करावा लागतो. कालेलकरांनीं अशक्य म्हणून दिलेल्या उदाहरणासारखेंच उदाहरण कलकत्त्याच्या शिष्टमान्य बंगालींत मिळतें :

क : त : प = क्ह : त्ह : फ ( घर्षक, ओष्ठ्य वा दंतौष्ठ्य ). पण तें पुन्हां फिरवून असें मांडलें म्हणजे झालें !

क : त : प = क्ह : त्ह : – = – : – : फ ( घर्षक ).

पण तसें करण्याचीहि जरूरी नाहीं. कारण पृ० ८७ वर कालेलकरच म्हणतात कीं संस्थानीय अर्धस्फोटक व घर्षक यांतला फरक भारतीय कानांना चटकन् लक्षांत येत नाहीं. परिवर्तनाच्या बाबतींत पुढील उदाहरणांचा विचार करावा.

लॅटिन क्, ग् यांची इ आदि स्वराअगोदर उत्क्रांति :

| लॅटिन | फ्रेंच | स्पॅनिश |
|---|---|---|
| क् | स् ( दन्त्य ) | थ् ( घर्षक ) |
| ग् | झ् ( तालव्य घर्षक ) | ख् ( घर्षक ) |

किंवा :

| इंडोयुरोपियन | संस्कृत | लॅटिन |
|---|---|---|
| * घ् | ह् | ह् |
| * ध् | ध् | f |
| * भ् | भ् | f |

" उद्घाटनाचें कोष्टक ( पृ. ५४ ) "

येथें दिलेल्या कांहीं चिन्हांचा उलगडा करणें आवश्यक आहे. X', यांचा उल्लेख मागें आलाच










आहे; *l'* म्हणजे 'तालव्य ल' (वर पहा); ॅ म्हणजे ओठ वर्तुलाकृति (ओ प्रमाणें) व जिह्वापृष्ठ कठीण टाळूजवळ (ए किंवा अॅ प्रमाणें). या पद्धतीनें म्हटलेला स्वर हा (ऑ असा लिहितां येईल; उदा० जर्मन कवि गॉटे); ह् + आ, ह् + आं म्हणजे निष्कंप आ, आं. (उँ, ऊँ, ऑ हीं चिन्हें अॅ व ऑ च्या जोडीला रूढ करण्यास हरकत दिसत नाहीं).

" संयुक्त स्वरांतील अंत्य आद्यापेक्षां कमी उद्घाटनाचा असतो. " (पृ० ५९)

हें फक्त उतरत्या स्वरसंयोगापुरतेंच खरें आहे. (पृ० ३२ पहा.)

" ध्वनिपरिवर्तनामागील कारणें – तत्त्वें अगम्य व अतर्क्य नाहींत " (पृ० ७० – ७१); " तीं अज्ञेय आहेत " (पृ० ८१).

हें कसें ?

" नियमानें बनविलेलीं काल्पनिक रूपें नियमित रूपांइतकींच ग्राह्य असतात. " (पृ० ८२ च्या शेवटीं) 'नियमित' च्या ऐवजीं 'लेखी पुराव्यांत उपलब्ध' (attested) असें पाहिजे.

' नवें ' याचें ' नवं ' होतें, पण ' इथें ' याचें ' इथं ' होत नाहीं. " (पृ० ९० – ९१).

पुष्कळांच्या उच्चारांत होतें.

' वृद्धि ' > मराठी ' वाढ ', हिंदी ' बुड्ढी ' " (पृ० १०२)]

बुड्ढी, बुढिया < वृद्धिका ?

" 'धर' चें ' धेला ' कां होत नाहीं ? " (पृ० ११८)] पूर्वी होत असावें. ' मौन धेलेंचि अर्जुनें ' (दासोपंत : गीतार्णव : २ : १६२८).

'संस्कृतच्या अज्ञानामुळें' (पृ. १५७, ओळ ६) यानंतर 'केललें आणि' असे शब्द घालावयास पाहिजेत.

कांहीं लिपिसुधारणा अंमलांतहि आणल्या गेल्या आहेत. (उदा० अे, अै). पण त्या रोगापेक्षां जालीम आहेत " (पृ. १६७– ८). पण कांहीं सुधारणांबद्दल ही तक्रार रास्त होणार नाहीं. उदा० त्त, क्त यांबद्दल ष्त, क्त लिहिणें.

' परिणामकारी ध्वनिविचार ' (प्र० १० चें शीर्षक, पृ० १६९). या शीर्षकानें बोध होत नाहीं. या प्रकरणांतील पृ० १७२ पर्यंतचा भाग दुसऱ्या प्रकरणांतच यायला हवा होता. कारण आघात, दाब, इत्यादिकांनीं वर्णाचीजी जोडणी होते ती वाच्यार्थनिष्पत्ति आणि व्याकरण यांच्याशीं स्वर-व्यंजनांइतकीच निगडित असते. उरलेला भाग ध्वनिव्यंजना आणि सौंदर्यनिष्पत्ति याबद्दल आहे.

" वैदिक भाषेंतील आघात " (पृ० १६९, पहिला परिच्छेद) – वैदिक भाषेंतील आवाज खालीं – वर नेणें (आरोहावरोह) याला ' स्वर ' म्हणतात. नंतरच्या संस्कृतमध्यें याचें जें परिवर्तन झालें त्याला पाहिजे तर 'आघात' (stress accent) म्हणावें.

" मराठींत आघात नेहमीं शब्दांतल्या शेवटच्या स्वरावर असतो. " (पृ० १७०) मराठींत आघात – रचनावश असतो हें खरें; पण त्याबद्दलचा नियम मात्र इतका सोपा नाहीं. गो. कृ. मोडकांचा ' मराठी स्वराघात ' (म. सा. प. जुलै – सप्टेंबर, ऑक्टो० – डिसेंबर १९४८) हा लेख जिज्ञासूंनीं पहावा.

जेम्स जॉइसच्या उताऱ्यांत दोनदां आलेला rivulet शब्द. (पृ० १८३)] ×, × ऐवजीं , ×× पाहिजे.

सूचीमध्यें पुढील भर पाहिजे : ओष्ठ्य, २१/ दंतौष्ठ्य, २३/ ध्वनिपरिवर्तन, अनपेक्षित, ११६ / मराठीची लेखनव्यवस्था, १५८ – १६३ / मराठीची वर्णव्यवस्था, ४३ – ४७, १५८/ साम्यनाश, १२० / स्थलांतर, १२१ / स्वरसामीप्य, १०२/.

— अशोक रा. केळकर

---

## साभार पोहोंच

प्रकाशक : के. भि. ढवळे, कर्नाटक हाऊस, चिराबाजार, मुंबई २ (१) लक्ष्मण गोपाळ ऊर्फ नाना दाते सोलापूरकृत पंचांग (शके १८७८) मूल्य अडीच आणे. (२) पं. पुरुषोत्तम रामचंद्रशास्त्री मोघे वसईकरकृत **विदर्भ-पंचांग** (शके १८७८), मूल्य तीन आणे. (३) पं. पुरुषोत्तम रामचंद्रशास्त्री मोघे वसईकरकृत **मुंबई-पंचांग** (शके १८७८), मूल्य अडीच आणे. (४) पं. पुरुषोत्तम रामचंद्रशास्त्री मोघेकृत **भारतीय वर्षभविष्य** मोठ्या पंचांगासह (शके १८७८), मूल्य एक रुपया. (५) पं. पुरुषोत्तमशास्त्री मोघेकृत **महाराष्ट्र-पंचांग** (शके १८७८), मूल्य ९ आणे.








Regd. No. B. 5177



प्राज्ञ पाठशाळा मण्डळ – ग्रन्थ प्रकाशन

## वैदिक संस्कृतीचा विकास

लेखक– **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,**

वैदिक संस्कृतीचें विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृति होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतांपर्यंत झालेल्या स्वरूपाचें वर्णन या पुस्तकांत प्राधान्यानें केलें आहे. वैदिक संस्कृतीच्या अभ्यासकास अत्यंत उपयोगी आणि मराठी भाषेंतील अत्यंत अप्रतिम अशा प्रकारचें हें पुस्तक आहे.

**किंमत ६ रु.**

प्रकाशक :– **व्यवस्थापक प्राज्ञपाठशाळामंडळ**

**वाई (जि० उ. सातारा)**






अनुक्रमणिका


